नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



---

**प्रकाशन : त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर, ग. ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे, आशा मुंडले, अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. २५४३३८६९
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** कार्यवाह, नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. २४४८६०१५
**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या / लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तसेच मैसूर येथील भारतीय भाषासंस्थान यांचेही अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन आणि भारतीय भाषासंस्थान सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** मृणालिनी शहा,
**प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी
**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

संपादकीय

# नवतरुणांची भाषा

तारुण्यात नव्याने पदार्पण केलेल्या मुलामुलींची भाषा ऐकण्याची संधी मला व्यवसायामुळे मिळते. तसं पाहिलं तर महाविद्यालयीन विद्यार्थी, अध्यापकांशी 'त्यांच्या' खास भाषेत बोलत नाहीत. ती कॉलेजकट्ट्यावरची भाषा असते! तरीही जातायेता ती भाषा कानी पडतेच. शिवाय घरीही कॉलेजकन्येशी बोलताना माझी त्या भाषेशी असलेली ओळख कायम राहते. मुलांना जाणून घेण्यासाठी त्यांची भाषा थोडीफार माहिती असणं आवश्यकही असतं.

हे महाविद्यालयीन तरुणांचं विश्व भावनांच्या अभिव्यक्तीबाबत फारच कंजूष आहे. भावविव्हल बोलणाऱ्याची येथे चेष्टा होते. एखाद्यानं शब्दबंबाळ, भावविवश बोलणं सुरू केलं की 'भाभिरुकु'चा गतिरोधक लावला जातो. 'भाभिरुकु' म्हणजे 'भावना भिजल्या, रुजल्या, कुजल्या.' म्हणजेच 'इमोशनल' बोलणं पुरे! त्यांचे असे अनेक सांकेतिक शब्दप्रयोग आणि वाक्प्रचार आहेत. वर्गात 'लेक्चर डोक्यावरून गेलं' असं न म्हणता ते म्हणणार 'पॅरलल गेलं!' एखादी गोष्ट 'समजत नाही' असं न म्हणता, म्हणतील 'झेपत नाही!' त्यांच्या जिभेवर रुळणारे आणखी काही वाक्प्रचार असे आहेत : पोपट होणे, टिंग्या टाकणे, सही असणे, गंडलेली (=बिघडलेली) असणे, पकवणे, बूंगाट (=वेगाने) सुटणे इत्यादी. यातही पुन्हा प्रादेशिक भेद असतीलच!

त्यांची भाषा कधीकधी प्रमाण भाषेतील श्रेणिबद्धतेच्या निकषांची मोडतोड आणि उलथापालथ करण्यात रमते. पौगंडावस्थेचे ते एक मानसिक लक्षणच आहे. त्यामुळे प्रौढ मंडळींना कानांना बरी न वाटणारी भाषा वापरण्यात त्यांना अभिमान वाटतो. त्यांच्यात एखादी गोष्ट 'चांगली असते' तेव्हा ती 'अशक्य' असते किंवा 'वाईट्ट' चांगली असते! 'ग्लासभर पाण्यात जीव दे', 'चाळणीत पाणी घेऊन जीव दे' अशा शिक्षा ही मंडळी मित्रमैत्रिणींना विनोदाने फर्मावताना दिसतात. ही भाषा प्रौढ मंडळींना अभद्र वाटण्याचीच शक्यता आहे. 'योगायोग' वगैरे सभ्य शब्दांऐवजी 'मटका बसणे' हा शब्दप्रयोग मुलांना जवळचा वाटतो! (तरी येथे तरुणांची 'स्लँग' लक्षात घेतलेली नाही!)

नुसती भाषाच काय त्यांचे उच्चारही वेगळे असतात. त्यांचे स्वराघात जसे

वेगळे असतात तसेच बोलण्याची तऱ्हाही काहीवेळा वेगळी असते. घशातून आवाज काढून बोलण्याची खास शैली काहींनी विकसित केलेली असते. तारुण्यसुलभ घोगरेपणाचा ते चातुर्याने वापर करतात. त्यांच्या बोलण्याचं आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे, ते बोलताना अधूनमधून अकारण हसत असतात. त्यांचं ते हसणं प्रौढांना खटकतं - आपला अनादर करण्यासाठी ती हसत आहेत, असं प्रौढांना वाटतं.

रेडिओमिर्चीवरचा खोखो पाटील जसे ग्रामीण मराठीतील हेल काढून हिंदीतून बोलतो, तसे संकरप्रयोग करणे या वयातल्या मुलांना आवडते. एकतर ते कोणत्याच एका भाषेत सलग बोलत नाहीत! मराठी, हिंदी, इंग्रजी यांच्या संकरातून त्यांचा भाषिक व्यवहार चालू असतो. तारुण्यातील मुक्ततेची आवड त्यांना भाषिक नियमांचा मुलाहिजा बाळगू देत नसावी! त्यामुळे त्यांच्या लेखनातही ही भाषेची स्वैर वळणे दिसत राहतात. एकदा एका विद्यार्थिनीने संस्कृतचा उतारा मराठीत अनुवादित करताना लिहिले, 'भीमाला पाहून घटोत्कच म्हणाला, "हा सेम माझ्या वडलांसारखा दिसतो."

त्यांच्या या भाषिक विशेषाचं अनुकरण हल्ली हिंदी गीतांमध्ये दिसू लागलं आहे. 'काय झालं', 'ऐका दाजिबा', 'इश्श' असे तोंडी लावण्यापुरते मराठी शब्द वापरून हिंदी गाणी लिहिली जात आहेत नि ती गाजतही आहेत.

मात्र तरुणांची भाषा दरवेळी बंडखोरीचीच असते, असे मानण्याचे कारण नाही. त्या भाषेत कल्पकताही असते. त्यांनी इतरांना बहाल केलेली टोपणनावे याच कल्पकतेतून स्फुरलेली असतात. त्यांनी अनेक लांबलचक शब्दांचे केलेले द्वैभाषिक संक्षेपही (उदा. एबीसी म्हणजे आप्पा बळवंत चौक, एमबीए म्हणजे मस्त बसून आराम, डीबीएस् म्हणजे धुणे, भांडी, स्वयंपाक इ.) भाषेचा 'मितव्यय' करण्याची गरज जणू आपल्या लक्षात आणून देतात. त्यांच्या भाषेत प्रासंगिक अशीही उत्स्फूर्तता असतेच. माझ्या मुलीच्या मैत्रिणीची एक 'भाषिक कृती' येथे सांगायला हवी. त्याची हकीकत अशी : मुलीची मैत्रीण सायकलवरून येत असताना एक तरुण सायकलस्वार तिची छेड काढू लागला. तेव्हा तिनं 'मातङ्गो गजो नागः कुञ्जरो वारणः करी' असा अमरकोशातल्या शब्दांचा त्याच्यावर एखाद्या क्षेपणास्त्रासारखा मारा केला. या अनपेक्षित हल्ल्याने तो तरुण गडबडून पळून गेला म्हणे!

ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायात मराठी भाषेवर केलेले रूपक येथे आठवते. त्यात त्यांनी मराठी भाषारूपी पृथ्वीवर साहित्यसोन्याच्या खाणी, प्रमेयांच्या बागा, नवरसांचे सागर, विवेकरूपी वेली इत्यादी निर्माण करण्यासाठी

आशीर्वाद देण्याची गुरूंना विनंती केली आहे. इये मराठीचिये नगरी आता प्रसंगोपात्त काही नवी रूपकेही भर म्हणून घालावी लागतील. जसं नवतरुणांची भाषारूपी 'रोप वे' देखील येथे अस्तित्वात आहे. 'रोप वे' का? तर ही मंडळी सरळ एका भाषेत व्यवहार करीत नाहीत. त्यामुळे दोन भाषांच्या डोंगरांना धरून जणू त्यांचा भाषिक विनिमयाचा व्यवहार चालू असतो. ही भाषा उंचावरची मोकळी हवा खाते, स्वतःच्या मस्तीत झुलत असते. ती उंची बघून आपल्यासारख्यांना मात्र गरगरण्याचीच शक्यता अधिक! ■

**नीलिमा गुंडी**

**भाषावार्ता**

**१)** भ्रमणध्वनीद्वारे 'एस.एम.एस.' करण्याची सोय मराठीसह इतर भारतीय भाषांमध्येही शक्य झाली आहे. ज्येष्ठ संगणकतज्ज्ञ डॉ. विजय भटकर यांच्या मार्गदर्शनाखाली 'पेन्फोसिस' या कंपनीने विकसित केलेल्या तंत्रज्ञानामुळे ही सोय उपलब्ध होणार आहे.

**२) मराठी विद्यापीठ :** 'ग्रंथाली' या संस्थेने 'मराठी विद्यापीठ' या नव्या उपक्रमाद्वारे मराठी भाषा, समाज व संस्कृती यांच्या विकासाची योजना आखली आहे. **पाहा :** आंतरजालकावरील संकेतस्थळ www.marathividyapeeth.org **संपर्क :** ग्रंथाली, म्युनिसिपल स्कूल इमारत, पहिला मजला, टोपीवाला लेन, डॉ. भडकमकर मार्ग, पोलिसस्टेशनसमोर, ग्रँटरोड, मुंबई - ४०० ०२७. दूरध्वनी क्र. २३८७५४८१

**सूचना फलक**

**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्या संबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन.

१) **प्रकाशन स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

२) **प्रकाशनाची कालनियतता :** त्रैमासिक, जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर.

३) **मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय, **पत्ता :** ३, अन्नपूर्णा १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे - ४११ ००२.

४) **मुद्रणस्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२ नवी पेठ, पुणे - ४११ ०३०.

५) **प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, पत्ता : कलम ३ प्रमाणे

६) **संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** मृणालिनी शहा, भारतीय,
**पत्ता :** १ शीतल अपार्टमेंट, ४६/४ एरंडवणा, पुणे - ४११ ००४.

मी नीलिमा गुंडी असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे. **नीलिमा गुंडी (प्रकाशक)**

# भाषाविद विश्वनाथराव नरवणे

स. म. परळीकर

सुप्रसिद्ध कोशकार आणि बहुभाषाविद विश्वनाथराव नरवणे यांचे ८ मे २००३ रोजी दुःखद निधन झाले. तसे ते गेले वर्षभर हृदयविकाराने आजारी होते आणि खूप अशक्तही झाले होते, त्यामुळे त्यांचा मृत्यू हा अनपेक्षित म्हणता येणार नाही. माणसाच्या कर्तृत्वाचे खरे महत्त्व त्याच्या मृत्यूनंतरच कळून येते. एखाद्या व्यक्तीने आपले जीवन किती सार्थकी लावले हे त्या व्यक्तीने केलेल्या कार्यावरच अवलंबून असते आणि त्या दृष्टीने पाहिले तर विश्वनाथरावांनी आपले जीवन हे पूर्ण सार्थकी लावले असेच म्हणावे लागेल. त्यांनी इतके विविध प्रकारचे कार्य केले आहे आणि विशेषतः 'भारतीय व्यवहार कोश' आणि 'भारतीय कहावत-संग्रह' हा त्रिखंडात्मक म्हणींचा कोश सिद्ध करून भारतीय भाषांच्या विकासास जो महत्त्वपूर्ण हातभार लावला आहे, त्याचे वर्णन शब्दांत करता येणार नाही. त्यांच्या भारतीय व्यवहारकोशाचे महत्त्व लक्षात घेऊन तत्कालीन राष्ट्रपती डॉ. राजेंद्र प्रसाद यांनी त्यांच्या कार्याचा गौरव केला होता आणि पंडित जवाहरलाल नेहरूंनी त्याचे प्रकाशन करताना प्रशंसोद्गार काढले होते. पुढे श्रीमती इंदिरा गांधी यांनीसुद्धा त्यांच्या या भाषिक योगदानाबद्दल त्यांचे मनापासून कौतुक केले. भारतातील अनेक नामवंत विद्वानांनी अत्यंत प्रांजलपणे त्यांच्या या कार्याचे यथोचित मूल्यांकन केले आहे.

विश्वनाथराव हे स्वभावतःच रसिक आणि काही तरी नवे करून दाखविण्याची आवड असणारे विद्वान होते. निरनिराळ्या भाषा शिकण्याची त्यांना हौस होती म्हणूनच नवनवीन भाषा शिकण्याची जी जी संधी त्यांना मिळाली तिचा लाभ घेऊन ते उत्तर भारतातील हिंदी, उर्दू, पंजाबी, राजस्तानी, बंगाली, आसामी इत्यादी भाषा शिकले तर दक्षिणेकडील कानडी, तेलगू, तामिळ, मल्याळी इत्यादी भाषांची कामापुरती तोंडओळख त्यांनी करून घेतली. त्यांचा जन्म १८ ऑगस्ट १९२४ रोजी रत्नागिरी जिल्ह्यातील नाखरे या गावी झाला. तेथेच त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. माध्यमिक शिक्षणासाठी काही दिवस ते रत्नागिरीस राहिले आणि नंतर मुंबईला जाऊन त्यांनी मॅट्रिकची परीक्षा दिली. पुढे चार वर्षे बडोद्यास राहून

त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करून बी. ए.ची पदवी संपादन केली. या चार वर्षांत गुजराती भाषा शिकण्याची चांगली संधी त्यांना मिळाली. पुढे राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या कार्यासाठी त्यांना पंजाब, आसाम आणि पूर्वेकडील प्रांतांत वास्तव्य करावे लागल्यामुळे निरनिराळ्या भाषा शिकण्याची संधी त्यांना मिळत गेली.

राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे प्रचारकार्य करीत असतानाच त्यांच्या मनात असा विचार आला की, आपल्या देशात अनेक भाषा प्रचलित असल्या तरी आपली संस्कृती एकच आहे आणि बहुसंख्य लोकांचा धर्मसुद्धा एकच आहे. भारतात हिंदु धर्म आणि भारतीय संस्कृती यांच्याशी संबंधित विचारांची अभिव्यक्ती प्रामुख्याने संस्कृतमधूनच होत होती आणि आजही धार्मिक संस्कारांची भाषा म्हणून संस्कृत भाषेचा भारतात सर्वत्र वापर केला जातो. अशा प्रकारे भारतात निरनिराळ्या प्रांतांतील भाषा जरी वेगवेगळ्या असल्या तरी त्या एकाच सांस्कृतिक परंपरेत गोवल्या गेल्या आहेत; म्हणून प्रत्येक सुशिक्षित भारतीयाने अधिकाधिक भारतीय भाषांचे व्यावहारिक ज्ञान तरी प्राप्त करून घेतले पाहिजे. या विचाराने प्रेरित होऊन विश्वनाथरावांनी 'भारतीय व्यवहार कोश' तयार करण्याची योजना आखली. हे काम तडीस नेणे एकट्या व्यक्तीच्या आवाक्याबाहेर होते. म्हणून त्यांनी भारतातील चौदा प्रमुख भाषा, संस्कृत आणि इंग्रजी अशा एकूण सोळा भाषांशी संबंधित विद्वानांचा एक गट (टीम) तयार केला आणि या सर्वांत कामाची वाटणी करून भारतीय व्यवहार कोशाच्या कामास १९५४ साली सुरुवात केली आणि सहा-सात वर्षांच्या अखंड परिश्रमांतून सन १९६१ साली हा कोश प्रसिद्ध झाला. त्याची पहिली आवृत्ती त्रिवेणी संगम या त्यांनीच स्थापन केलेल्या प्रकाशन संस्थेतर्फे प्रकाशित करण्यात आली. याच्या छपाईसाठी जो खर्च आला त्यापैकी बहुतांशी रक्कम बडोद्याच्या फत्तेसिंह गायकवाड यांचेकडून मदत म्हणून मिळाली. पुढे या कोशाच्या तीन आवृत्त्या निघाल्या आणि त्या पुण्याच्या मेहता पब्लिशिंग हाउसने प्रकाशित केल्या.

भारतीय व्यवहार कोशाच्या कामासाठी विश्वनाथरावांनी स्वखर्चाने भारतभर प्रवास केला. प्रसंगी ते धर्मशाळेतसुद्धा राहिले. यासाठी त्यांनी 'तुम मुझे शब्द दो, मैं तुम्हें धन्यवाद दूँगा' हे घोषवाक्य ठरविले आणि त्यास अनुसरून प्रांताप्रांतांत हिंडून त्यांनी शब्दांची भीक मागितली. अशा प्रकारे हिंडून त्यांनी नित्याच्या व्यवहारातले सुमारे चाळीस हजार शब्द निवडले आणि त्यांचे भारतातील

प्रमुख चौदा भाषा, संस्कृत आणि इंग्रजी यांच्यात भाषांतर करून कोशाचा एक भाग पूर्ण केला. तथापि, नुसते शब्द आणि त्यांचा अर्थ समजला तरी त्यांचा नित्याच्या व्यवहारात वापर करता येत नाही. व्यवहारात नेहमी शब्दांऐवजी लहान लहान वाक्यांचा वापर केला जातो. म्हणून विश्वनाथरावांनी नित्याच्या व्यवहारातील निवडक वाक्ये निवडली आणि त्यांचे वरील सोळा भाषांत भाषांतर देऊन कोशाचा उत्तरार्ध पूर्ण केला. त्यामुळे या कोशाचे 'भारतीय व्यवहार कोश' हे नाव अत्यंत समर्पक वाटते. या कोशाचे महत्त्व श्री. स. का. पाटील (तत्कालीन रेल्वे मंत्री) यांनी ओळखले होते. म्हणून त्यांनी विश्वनाथरावांना रेल्वेचा प्रथम श्रेणी (वातानुकूल) चा पास देऊन या कामासाठी भारतभर हिंडण्याची मोफत सुविधा उपलब्ध करून दिली. ही सुविधा उपलब्ध झाल्यामुळे पुढे 'भारतीय कहावत - संग्रह' या त्रिखंडात्मक म्हणींच्या कोशाचे काम करताना त्यांना निदान स्वतःचे पैसे खर्च करून प्रवास करावा लागला नाही. प्रवासाची ही सवलत त्यांना सुमारे पाचसहा वर्षे लाभल्यामुळे या कामासाठी करावा लागलेला प्रवास सुखकर झाला.

विश्वनाथ नरवणे हे स्वस्थ बसणारे गृहस्थ नव्हते. भारतीय व्यवहार कोशाचा प्रचंड प्रकल्प पूर्ण झाल्यावर त्याहूनही अधिक मोठा प्रकल्प त्यांनी हाती घेतला आणि तो म्हणजे 'भारतीय कहावत - संग्रह' हा त्रिखंडात्मक म्हणींचा कोश तयार करण्याचा. त्यांनी भारतातील चौदा प्रमुख भाषांतील म्हणींचे संकलन करण्यास सुरवात केली. भारतात अनेक भाषा बोलल्या जात असल्या तरी भारतीय संस्कृती ही बऱ्याच प्रमाणात सर्वत्र सारखीच असल्यामुळे भारतातील प्रमुख भाषांच्या म्हणीतून ही सांस्कृतिक एकता दिसून येते. प्रायः प्रत्येक म्हणीमागे एखादी घटना किंवा प्रसंग असतो. बऱ्याच ठिकाणी हा प्रसंग शोधण्याचाही प्रयत्न या कोशात दिसून येतो. या कोशाच्या पहिल्या खंडाला विश्वनाथरावांनी 'कहावतों की दुनिया में' या नावाने एक विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. या प्रस्तावनेत त्यांनी म्हणीची व्याख्या, स्वरूप, उगम, प्रकार इत्यादींचा विस्ताराने ऊहापोह केला आहे. ही प्रस्तावना म्हणजे विश्वनाथरावांच्या विविध भारतीय भाषांच्या विस्तृत ज्ञानाचे प्रत्यक्ष प्रमाण आहे. या प्रस्तावनेत त्यांनी जे मौलिक (ओरिजिनल) विचार मांडले आहेत त्यामुळे तिला एखाद्या शोधप्रबंधाचा दर्जा प्राप्त झाला आहे. मी अनेक वेळा त्यांना असे सुचवून पाहिले की, या प्रस्तावनेस शोधसंदर्भ आणि तळटिपा जोडून तिला शोधप्रबंधाचे रूप द्यावे आणि हा प्रबंध पीएच. डी.साठी सादर करावा. परंतु विश्वनाथरावांच्या दृष्टीने या कामाचे जे महत्त्व होते ते पीएच.डी.ची पदवी

मिळविण्यापेक्षा किती तरी अधिक होते आणि एकार्थाने त्यांचे हे मत बरोबरही होते; कारण पीएच.डी. मिळविलेल्या विद्वानाचे कार्य सर्वांपर्यंत पोहोचेलच याची खात्री देता येत नाही, पण कोशासारखे भरीव कार्य केलेल्या विद्वानास सर्वजण एक कोशकार म्हणून निश्चितपणे ओळखतात.

'भारतीय कहावत-संग्रह' तयार करतानासुद्धा त्यांनी प्रत्येक भाषेसाठी एक किंवा दोन विद्वान निवडले आणि त्यांचा एक गट (टीम) तयार करून त्या सर्वांकडून अगदी योजनाबद्ध पद्धतीने हे काम पूर्ण करून घेतले. या कोशाचा प्रथम खंड १९७८ मध्ये, दुसरा खंड १९७९ मध्ये आणि तिसरा १९८३ मध्ये, त्रिवेणी संगम या त्यांनीच स्थापन केलेल्या संस्थेतर्फे प्रकाशित करण्यात आला. हे सर्व खंड छापून घेण्याचे काम अत्यंत जिकिरीचे होते आणि त्या कामी विश्वनाथरावांना बराच शारीरिक आणि मानसिक त्रास सहन करावा लागला. याच कालखंडात त्यांना रक्तदाबाचा त्रास सुरू झाला पण कोणत्याही परिस्थितीत हे काम तडीस न्यावयाचेच अशा कृतनिश्चयाने त्यांनी हे काम पार पाडले. पहिल्या खंडाच्या छपाईचा शुभारंभच तर्कतीर्थ लक्ष्मणराव जोशी यांच्या शुभ हस्ते करण्यात आला. दुसऱ्या खंडाचा प्रकाशन समारंभ भरत नाट्यमंदिरात अत्यंत भव्य प्रमाणात साजरा झाला आणि त्यासाठी हिंदीचे सुप्रसिद्ध कवी हरिवंशराय बच्चन यांना पाचारण करण्यात आले होते. बच्चन यांनी नरवणे यांच्या कामाची तोंड भरून स्तुती केली. या प्रचंड कामासाठी लागणारा पैसा जमविताना विश्वनाथरावांना खूप अडचणींना तोंड द्यावे लागले. तथापि मुळातच त्यांचा स्वभाव हा कोणत्याही परिस्थितीत न डगमगणारा असल्यामुळे त्यांनी या सर्व अडचणींवर मात केली. कोशांच्या विक्रीची आगाऊ नोंदणी करण्याची योजना आखून त्यांनी पैसा गोळा केला आणि जेव्हा पैसा कमी पडला त्यावेळी विश्वनाथरावांचे मित्र अरविंद मफतलाल हे त्यांच्या मदतीस धावून आले आणि कोणत्याही क्षणी त्यांनी पैशाची कमतरता भासू दिली नाही. कोशाचा तिसरा खंड प्रकाशित करताना कोणताही सोपस्कार न करता आगाऊ नावे नोंदलेल्या लोकांकडे अत्यंत कृतज्ञतापूर्वक ग्रंथ धाडून गाजावाजा न करता तिसरा खंड प्रकाशित झाल्याचे त्यांनी घोषित केले.

भारतीय व्यवहार कोश आणि भारतीय कहावत-संग्रह हे दोन्ही कोश तयार करताना विश्वनाथ नरवणे यांनी एखाद्या संशोधकास साजेल अशा शास्त्रीय दृष्टीचा अवलंब केला आहे. त्यांनी नेहमीच्या कोशात ज्या प्रमाणे 'अकारादी' क्रमाने शब्द घेतले जातात त्या पद्धतीने शब्द किंवा म्हणी दिल्या नाहीत. त्यांनी व्यवहारात शब्द

आणि म्हणी ज्या प्रकारे वापरल्या जातात त्यांचा आशय लक्षात घेऊन दोन्ही कोशांत त्यांचे वर्गीकरण केले आहे. उदाहरणार्थ, भारतीय व्यवहार कोशात त्यांनी अनाज (धान्य), औजार (साधने), प्राणी, फल असे विभाग केले आहेत. भारतीय कहावत संग्रहातसुद्धा त्यांनी म्हणींच्या अर्थाप्रमाणे निरनिराळे विभाग केले आहेत. त्यामध्ये नित्याच्या व्यवहारातील जवळ जवळ ९६ विषय आले आहेत. भारतीय कहावत-संग्रहाच्या तिसऱ्या खंडात मात्र त्यांनी प्रत्येक भाषेतील महत्त्वाच्या निवडक म्हणी आणि त्यांचे इंग्रजी आणि हिंदी भाषेत अर्थ आणि शक्य असेल तेथे त्या म्हणींचे पर्याय सुद्धा दिले आहेत. या म्हणी देताना भाषा आणि म्हणी यांचा क्रम 'अकारविल्हे' ठेवला आहे. त्यामुळे वाचकांना विशिष्ट म्हणींचे अर्थ शोधताना कोणतीच अडचण येत नाही. हे दोन्ही कोश माहितीपूर्ण तर आहेतच पण अगदी सामान्य वाचकसुद्धा एखाद्या कादंबरीप्रमाणे ते अगदी आवडीने वाचू शकेल इतके ते वाचनीय झाले आहेत.

भारतातील चौदा भाषांची लिपी, वर्णमाला आणि ध्वनी यांत खूपच अंतर आहे. तथापि इंग्रजी सोडून अन्य सर्व भारतीय भाषांसाठी नरवणे यांनी देवनागरी लिपीचाच वापर केला आहे. देवनागरी लिपी ही कितीही उच्चारानुसारी असली तरी सर्व प्रकारचे ध्वनी तिच्यात सामावले जाऊ शकत नाहीत. उदाहरणार्थ, मराठीच्या 'च' वर्गाचे (च़्, छ़्, ज़्, झ़्,) ध्वनी दाखविताना किंवा मराठी आणि दाक्षिणात्य भाषांत वारंवार येणारा 'ळ' हा ध्वनी दाखविताना त्याखाली नुक्ता (टिंब) देऊन त्यांचे वेगळेपण निदर्शनास आणावे लागते. त्यासाठी मूळ देवनागरीत वापरल्या जाणाऱ्या ध्वनिचिन्हांच्या संख्येत वाढ करून या कोशांत ७५ ध्वनिचिन्हांचा वापर करण्यात आला आहे. या संबंधीची आवश्यक ती माहिती दोन्ही कोशांच्या प्रारंभी दिली आहे.

महाराष्ट्रात प्रचंड कामाचे ढीग उपसणारे अनेक एकांडे शिलेदार होऊन गेले आहेत. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे, ज्ञानकोशकार डॉ. केतकर, प्राचार्य वा. गो. आपटे ही काही नावे वानगीदाखल देता येतील. विश्वनाथराव नरवणे सुद्धा याच पंक्तीत शोभून दिसणारे कोशकार आहेत. जरी त्यांनी या कामी त्या त्या भाषेतील नामवंत विद्वानांची मदत घेतली असली तरी कोशांच्या संपादनाचे महत्त्वपूर्ण काम त्यांनी एकट्याने पूर्ण केले, हे नाकारता येणे शक्य नाही. हे काम करताना त्यांनी आधुनिक कार्डपद्धतीचाही वापर केला होता. त्यामुळे कार्डांच्या आधारे कोणताही संदर्भ चटकन शोधण्यास वेळ लागत नसे. ही कार्डे बहुतांशी

त्यांनी स्वतःच्या हस्ताक्षरात तयार केली होती. त्यांच्या हस्ताक्षराविषयी काय सांगावे? अगदी छापील मजकूर देखील त्यांच्या सुंदर हस्ताक्षरापुढे फिका वाटत असे. अगदी साधा धनादेश द्यावयाचा असला तरी तोसुद्धा ते इतक्या सुंदर अक्षरात लिहीत असत की त्याकडे पाहत राहावे, असे वाटत असे.

कोशकार हा विश्वनाथरावांच्या एकूण व्यक्तिमत्त्वाचा एक प्रमुख पैलू असला तरी त्यांचे व्यक्तिमत्त्व अगदी बहुरंगी होते. मुळातच ते अगदी रसिक होते. त्यामुळे कोणतेही काम ते अगदी हसत-खेळत करीत असत. वाङ्मयातील बारकावे आणि मर्म जाणण्याची अद्‌भुत क्षमता त्यांच्यात होती. एखादी कविता आपण वाचावी आणि तीच कविता विश्वनाथरावांच्या तोंडून ऐकावी यांत जमीन-आसमानाचा फरक जाणवत असे. ते स्वतः एक उत्तम कवी होते. त्यांच्या अनेक कविता कपाटात नुसत्या पडून होत्या. त्यांच्या सुविद्य पत्नी प्रा. कविता नरवणे यांना त्या जाणकार वाचकांसमोर आणाव्यात असे वाटले, म्हणून त्यांनी गेल्या वर्षी 'शेष सुंदर' या नावाने त्यांच्या कवितांच्या पुस्तकाचे प्रकाशन समारंभपूर्वक घडवून आणले. या काव्यसंग्रहात विश्वनाथरावांच्या अनेक मौलिक कविता आहेत आणि त्याचबरोबर त्यांनी उर्दूतील काही शेरांचा मराठीतून केलेला तेवढ्याच तोलामोलाचा पद्यानुवादही आहे. उदाहरणार्थ, 'चक़बस्त' या उर्दू कवीचा देशभक्तिपर शेर आणि त्याचा नरवणे यांनी केलेला अनुवाद पाहण्याजोगा आहे. 'चक़बस्त' म्हणतो -

> बुलबुल को गुल मुबारक, गुल को चमन मुबारक
> हम बेकसोंको अपना प्यारा वतन मुबारक ।

याचा नरवणे यांनी केलेला पद्यानुवाद खालील प्रमाणे आहे -

> लखलाभ पुष्प भ्रमरां, लखलाभ बाग पुष्पां
> व्याकुळ परी आम्हांला, लखलाभ देश अमुचा ।

यामध्ये बुलबुल ऐवजी त्यांनी भ्रमराच्या प्रेमाचा दाखला दिला आहे कारण भारतीय लोकांना बुलबुलापेक्षा भ्रमर अधिक जवळचा आहे.

त्यांच्या स्वतःच्या कवितांतून प्रेम, राष्ट्रभक्ती, कलासक्ती इत्यादी विविध प्रकारच्या भावभावनांचा सुंदर आविष्कार झालेला आहे. उदाहरणार्थ, 'नेत्रदर्पणी' या त्यांच्या कवितेतील प्रणयभावना किती रसिकतेने आणि सूचकतेने व्यक्त झाली आहे हे खालील काव्यपंक्तींवरून दिसून येईल -

> दोन आरसे इथे प्रीतिचे
> दर्शक ते तुज मम हृदयाचे

तिथे वसे तव छबी साजणी
प्रतिबिंब पहा मम नेत्रदर्पणी

विश्वनाथराव नरवणे यांची रसिकता अशा प्रकारे त्यांच्या काव्यातून प्रकट झाली आहेच. परंतु त्यांच्या नित्याच्या व्यवहारातून सुद्धा ती दिसून येत असे. कोणताही पदार्थ ते अत्यंत चवीने खात असत. 'चवीने खाणार त्याला पत्नी करून घालणार' ही उक्ती नरवणे पति-पत्नींच्या बाबतीत तंतोतंत खरी मानावी लागेल. तसा या दोघांचा विवाह ठरवून झाला असला तरी वैवाहिक जीवनात ते एकमेकांशी इतके एकरूप झाले होते की यांचा प्रेमविवाहच झाला असावा, असे इतरांना वाटे. विश्वनाथराव नरवणे यांच्या हातून जे प्रचंड काम•घडून आले त्या मागे श्रीमती कविताबाईंचे संपूर्ण पाठबळ होते. विशेषतः ज्या ज्या वेळी विश्वनाथराव काम कसे पूर्ण होईल या काळजीत असत त्या त्या वेळी त्यांची काळजी दूर व्हावी म्हणून त्या सर्वतोपरी प्रयत्न करीत असत. त्यामुळे हे दांपत्य एकमेकाला अगदी अनुरूप (मेड फॉर इच आदर) होते, असेच म्हणावेसे वाटते. तथापि विश्वनाथरावांचा मूळचा स्वभाव आनंदी असल्यामुळे ते 'आनंदयात्री' म्हणूनच ओळखले जात असत.

विश्वनाथराव नरवणे यांचा आणखी एक वाखाणण्याजोगा विशेष म्हणजे त्यांची प्रखर राष्ट्रभक्ती. देशावर आलेल्या संकटाच्या प्रसंगी त्यांच्या देशभक्तीचे प्रकर्षाने दर्शन घडत असे. दादरा-नगर-हवेलीच्या मुक्तिसंग्रामात त्यांचा जातीने सहभाग होता. तेथे पोर्तुगीज सरकारचा जो खजिना या लोकांच्या हाताला लागला तो जसाच्या तसा महाराष्ट्राचे तत्कालीन मुख्यमंत्री मोरारजी देसाई यांच्या हवाली करताना मोरारजी देसाई यांनीसुद्धा त्यांच्या देशभक्ती बरोबरच उज्ज्वल चारित्र्याची मुक्तकंठाने स्तुती केली होती. या देशभक्ती बरोबरच क्रिकेट सारख्या खेळाचे आत्यंतिक आकर्षण हेसुद्धा त्यांच्या खिलाडू वृत्तीचे परिचायक होते. ते देशभक्त असले तरी इंग्रजांच्या चांगल्या गोष्टींचे त्यांना वावडे नव्हते.

विश्वनाथरावांच्या कार्याची समाज आणि सरकार या दोघांनीही योग्य ती दखल घेतल्यामुळे त्यांना आपण केलेले परिश्रम सार्थकी लागल्याचे समाधान वाटत असे. 'भारतीय व्यवहार कोश' प्रकाशित झाल्यावर त्यांना तत्कालीन प्रधान मंत्री लालबहादुर शास्त्री यांच्या हस्ते 'राष्ट्रपति-पदक' देऊन गौरविण्यात आले होते. १४ सप्टेंबर १९९२ रोजी उत्तर प्रदेश सरकारने त्यांना श्री. अटलबिहारी वाजपेयी यांच्या हस्ते 'सौहार्द सम्मान' देऊन गौरविले होते. त्याचप्रमाणे अखिल

भारतीय साहित्य परिषदेचा पुरस्कारही त्यांना पुन्हा श्री. अटलबिहारींच्या हस्तेच देण्यात आला होता. महाराष्ट्र सरकारचा छत्रपती शिवाजी एकता पुरस्कारही त्यांना श्री. मनोहर जोशींच्या उपस्थितीत पुन्हा श्री. अटलबिहारी वाजपेयी यांच्याच हस्ते देण्यात आला होता.

अशा या माझ्या ज्येष्ठ स्नेह्याला माझी विनम्र श्रद्धांजली.

'श्रीराम' १८, क्षिप्रा सहनिवास, कर्वेनगर पुणे - ५२

## सूचना फलक

वर्ष २१ : ४ दिवाळी २००३ अंकातील मुद्रित चुकांबद्दल दिलगिरी व्यक्त करत आहोत.

| पृष्ठ | ओळ | शब्द असा आहे | शब्द असा वाचावा |
|---|---|---|---|
| १ | १३ | अविष्कार | आविष्कार |
| १ | २० | संवेदनाक्षम | संवेदनक्षम |
| २ | ८ | उणीवांवर | उणिवांवर |
| ३ | २ | निर्मिती तंत्र | निर्मितितंत्र |
| ५ | १६ | मेधातिथि | मेधातिथी |
| ५ | २२ | डिष् | ड्ष् |
| ७ | ७ | नशिबवान | नशीबवान |
| ९ | १ | जैनधर्मियाने | जैनधर्मीयाने |
| ९ | २६ | तरूणाला | तरुणाला |
| १० | २६ | on | of |
| १२ | २९ | नातेवाईकांनाही | नातेवाइकांनाही |
| १३ | ३ | तो जिथे असेल तिथे ही चूक दुरुस्ती करून घ्यावी | |
| २९ | ७ | रुपे | रूपे |
| २९ | १९ | दृष्टवा | दृष्ट्वा |
| ३१ | २२ | अस्तित्त्व | अस्तित्व |
| ३३ | २१ | असेण | असणे |
| ३९ | ७ | पूर्वसुरींनी | पूर्वसूरींनी |
| ४० | १० | मतभेत | मतभेद |
| ४१ | १७ | अभासाची | अभ्यासाची |
| ४६ | ६ | हिंदी-उर्दुची | उर्दूची |
| ५० | २८ | विभक्तीरचना | विभक्तिरचना |
| ५६ | ९ | सहिष्णु | सहिष्णू |
| ५९ | २१ | मॉक्सिन | मॅक्सीन |

# विदर्भ बोली

**प्रतिमा इंगोले**

प्राचीन काळी विदर्भाची व्याप्ती थेट महाराष्ट्रभर होती. विदर्भ देशास नंतर महाराष्ट्र म्हणू लागले. "विदर्भ" ह्या नावाने संबोधित केला जाणारा हा संपूर्ण प्रदेश पूर्वीपासून प्रगतिपथावर होता. म्हणजेच आदि-महाराष्ट्राला "विदर्भ" संबोधिले जात होते. त्याकाळी ह्या संपूर्ण भूप्रदेशाची भाषा एकच होती आणि ते वऱ्हाडी बोलीचे पूर्व रूप होते.

मुरारी कवीने अनर्घराघवात विदर्भ म्हणजेच महाराष्ट्र असा उल्लेख केला आहे. ह्या प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या भाषेलाच पुढे महाराष्ट्री संबोधू लागले. हिलाच काही प्राकृत किंवा देशी ह्या नावानेही संबोधीत होते. यादवांच्या काळी विदर्भात सुबत्ता होतीच. पण तत्पूर्वीही विदर्भ हे वाङ्मय निर्मितीचे महत्त्वाचे केंद्र होते. महाकवी गुणाढ्य यांनी रचलेला ग्रंथ बृहत्कथा मंजिरी आणि प्रसिद्ध गणिती भास्कराचार्य यांनी लिहिलेला सिद्धान्त शिरोमणि, वात्स्यायन मुनीने लिहिलेला कामसूत्रे हा ग्रंथ व त्यावरील यशोधराने रचिलेली टीका जयमंगल, सम्राट सर्वसेनाचा हरिविजय आदी ग्रंथसंपदा विदर्भातीलच!

पुढे ह्याच महाराष्ट्रात मराठीचा जन्म झाला. अर्थातच तत्पूर्वी तिचे बोली भाषा म्हणून असलेले रूप हीच वऱ्हाडी भाषा होय. आज मराठी प्रमाणभाषा झाल्यामुळे वऱ्हाडीला बोलीचा दर्जा मिळाला आहे इतकेच! काळाच्या दृष्टीने विचार केला तर प्राकृत, महाराष्ट्री, अपभ्रंश व नंतर मराठी असा क्रम दिसतो. ह्यातील अपभ्रंश भाषेलाच देशी भाषा म्हणत. हीच आद्य वऱ्हाडी बोली होय; कारण विदर्भदेश म्हणजेच प्राचीन महाराष्ट्र होय. ज्ञानेश्वर जेव्हा बोलीभाषेत ज्ञानेश्वरी लिहितात तेव्हा देशीकार लेणे चढवायचे आहे, असे म्हणतात. अपभ्रंश भाषेत वापरली जाणारी दिज्जइ, जाईज्जई सारखी रूपे आजही वऱ्हाडीत देजो, जाजो, करजो, अशी वापरली जातात. त्यानंतरही विदर्भात बरेच ग्रंथ निर्माण झालेत. विदर्भकर्पूर मंजिरी, बृहत्कथा मंजिरी हे आद्य ग्रंथ होत. पण ज्या काळात मराठी नावारूपाला आली त्या काळात आणि विदर्भ महाराष्ट्रापेक्षा वेगळा समजला गेला त्या काळातही विवेकसिंधू, लीळाचरित्र, महदंबेचे धवळे अथवा संपूर्ण महानुभाव वाङ्मय

विदर्भातच निर्माण झाले. त्यामुळे वि.ल. भावे 'मराठीचे माहेर विदर्भातच आहे' असे म्हणतात, ते योग्यच आहे.

त्यामुळेच वऱ्हाडी बोलीभाषेला मराठीच्या जननीचा बहुमान द्यायला हवा. ज्ञानेश्वरी त्या काळातील बोलीतच लिहिली गेली. आणि ज्ञानेश्वरीच्या भाषेत आणि वऱ्हाडी भाषेत खूप साम्य आहे. त्या काळात महाराष्ट्रात बोलली जाणारी भाषा नंतर फक्त विदर्भातच बोलीच्या रूपात टिकून राहिली. इतर प्रांतांनी मराठीचा पुरस्कार केला व त्या त्या प्रांतांच्या भौगोलिक, ऐतिहासिक स्थित्यंतरांचा त्या त्या प्रदेशातील बोलीवर परिणाम होत गेला.

एकंदर वऱ्हाडी भाषेला अतिशय प्राचीन परंपरा आहे. भाषा जेव्हा नागर स्वरूप प्राप्त करते तेव्हा ती शिष्टमान्य होते. वऱ्हाडी भाषेचे असे नागर रूपच मराठी होय. ती मराठीचे तान्हे रूपडे आहे. म्हणूनच वऱ्हाडी ही अंगभूत सौंदर्य लाभलेली भाषा आहे. ती कृत्रिम नाही. त्यामुळेच लवचीकता, लयबद्धता आणि गोडवा ही तिची वैशिष्ट्ये ठरतात. त्याचप्रमाणे ती सुटसुटीत, मोहक आणि ओघवती भाषा आहे. तिच्यात नादमधुरता आणि कोवळीक आहे.

भाषेच्या शब्दाशब्दांत इतिहास दडलेला असतो. त्या त्या देशाच्या, प्रदेशाच्या भाषेत तेथील लोकांच्या आशाआकांक्षेचे अनुभव, समजुतीचे, चालीरीतीचे प्रतिबिंब उमटलेले असते. वऱ्हाडी भाषाही याला अपवाद नाही. येथील लोकसाहित्याद्वारा किंवा विदर्भात होऊन गेलेल्या कीर्तनसम्राट गाडगेबाबांच्या कीर्तनांद्वारा ह्या भाषेची श्रीमंती उलगडली जाऊ शकते. वऱ्हाडी खरी लोकभाषा आहे. तसेच मराठीचा विकास करण्यात तिचा सिंहाचा वाटा आहे.

वऱ्हाडी बोलीभाषेत 'ण'चा अभाव आहे. 'ओ'च्या ऐवजी 'व' वापरतात, तसेच 'ला' विभक्तिप्रत्ययाऐवजी 'ले' वापरतात. सामान्य रूपाच्या हा प्रत्ययाने अनेकवचने तयार केली जातात. स्त्रिया प्रथमपुरुषी बोलतात. 'ळ'च्या जागी 'य' वापरतात. वऱ्हाडीत चालू वर्तमानकाळ आजही वापरात आहे. तर देजो, करजो, ही रूपे टिकून आहेत. ही वऱ्हाडीची काही महत्त्वाची वैशिष्ट्ये!

यादवकाळातील मराठी भाषेचे अवशेष आजही वऱ्हाडी भाषेत टिकून आहेत. ह्या काळातील ग्रंथ चाळले असता, आजच्या वऱ्हाडीत त्यांतील शब्द-विशेष, व्याकरण-विशेष आणि भाषा-विशेषही आढळतात. ज्ञानेश्वरीतील चेवो, वऱ्हाडीत आजही चेव येणे ह्या रूपात शिल्लक आहे. अशी अनेक उदाहरणे देता येतील. ह्यावरून यादवकाळात वऱ्हाडी भाषाच वापरात होती हे सिद्ध होते. नागर मराठीचा

जन्म शिवकाळापासून झाला असावा, असे अनुमान काढता येते.

म्हणजेच बोलीभाषा ह्या आधीच तयार झालेल्या असतात. त्यामुळेच प्रमाण भाषेचा अभ्यास करताना बोलींचा अभ्यास आवश्यक असावा. पण असे घडत नाही. वऱ्हाडी बोली उपेक्षित आहे. कारण भाषेचे केन्द्रस्थान पुणे आहे. आणि ते विदर्भापासून बरेच दूर आहे. वऱ्हाडी भाषेला आज कनिष्ठ लेखण्यात आले तरी ती समृद्ध बोली आहे. बोलीभाषांच्या संयोगाने बंदिस्त प्रमाण-भाषा गतिमान होऊ शकते पण अर्थातच बोलीकडे पाहण्याचा पूर्वग्रहदूषित दृष्टिकोन टाळला तरच!

वऱ्हाडी भाषा विदर्भातील लोकजीवनाचे अविभाज्य अंग आहे. माणसाची संस्कृती त्याच्या भाषेतच सामावलेली असते असे म्हणतात. भाषेच्या विकासाबरोबर संस्कृतीचा विकास होतो, तर संस्कृतीच्या विकासाबरोबर भाषेचा विकास होतो. समाज आणि संस्कृतीत सारखे बदल होत असतात. आणि लोकभाषा हे बदल स्वीकारत असते त्यामुळे कालांतराने तिच्यात बदल होत जातात. अर्थात वऱ्हाडी भाषाही अशीच बदलली आहे. तरीही तिचे आद्य रूप बऱ्याच प्रमाणात शिल्लक आहे. पण जिथे मराठीच आज धोक्यात आहे, तिथे वऱ्हाडीबद्दल चिंता करण्यात काय अर्थ आहे?

ज्ञानेश्वरांचा 'मऱ्हाटा बोल' आज महाराष्ट्राचा अभिमानाचा विषय आहे. ह्या बोलातील 'मऱ्हाटा' ह्याचा अर्थ सुलभ आणि सोपा असा आहे. 'मज विवेकु तो सांघावा ! मऱ्हाटा जी' (३.१७) ह्या ज्ञानेश्वरीतील ओवीतून हाच अर्थ प्रतीत होतो तर मऱ्हाटा ह्या प्रांतवाचक शब्दातून उघडा, स्पष्ट, सरळ, सोपा असाच अर्थ प्रतीत होतो. विदर्भातील एका लोकगीतात -

"महाराठ देश्यामंदी, पिकाची कमती नाही
धानाचं पिक लई, उभ्या कपाशीच्या रासी वो माहे गिरजाबाई"

असा उल्लेख आहे. ह्यावरून महाराठ हे महाराष्ट्र शब्दाचे आद्यरूप असावे असे अनुमान काढता येते व ह्याच प्रदेशाला देश म्हणत होते हेही सिद्ध होते.

'एकवचन बहुवचन मानिसी आणि भेदू न मानीसि ऐसी विरुधोक्ती 'देशी' तुजसि साजे' ह्या उद्धवगीतेतील (५६८) ओळीतून पूर्वीही देशीभाषेला तुच्छ समजत होते, हेच दिसून येते. लोकभाषेला गावंढळ म्हणणे आणि लोकसाहित्याला गावठी म्हणणे हे पूर्वापार चालत आले आहे, हे ह्यावरून स्पष्ट होते. जे आपले आहे ते विसरून जेत्यांचा उदो उदो करणे ही परंपरा बनली आहे. आज आपण इंग्रजीचा उदो उदो करीत आहोत.

वरील उदाहरण एवढ्याचसाठी की, वऱ्हाडीला पूर्वीही ती जेव्हा देशीभाषा होती तेव्हाही आणि आताही गावंढळ मानले जाते. पण ते चूक आहे. कारण ह्याच भाषेच्या साह्याने महाराष्ट्रातील संस्कृती वाढली आहे. प्रगल्भ आणि श्रीमंत बनत आहे. त्यामुळे वऱ्हाडी समजत नाही; अशी तक्रार करण्यापेक्षा ती समजून घेणे आवश्यक आहे. कदाचित त्यामुळे मराठीच्या मुळापर्यंत जाता येईल आणि मराठीचा स्वाभिमान नव्याने दृढ होण्यासही हातभार लागू शकेल.

वऱ्हाडी भाषा महाराष्ट्रात उपेक्षित आहे असे नाही तर, ती विदर्भातही उपेक्षितच आहे. वऱ्हाडीचा भाषाशास्त्रदृष्ट्या फारसा अभ्यास झालेला नाही. विशेष म्हणजे वऱ्हाडी भाषेने इतर भाषांच्या संपर्कातही आपले स्वत्व आणि प्राचीनत्व कायम राखले आहे. पूर्णाकाठाने ती आज तिच्या निखळ रूपात शिल्लक आहे, तर उर्वरित विदर्भात जवळच्या भाषांचे संपर्क झेलीत आपल्या गुणवैशिष्ट्यांसह नांदते आहे. विदर्भातील ग्रामीण भागात ती आदानप्रदानाचे मुख्य साधन आहे.

भाषेत साहित्यनिर्मिती झाली की भाषा स्थिरावते म्हणतात. आज वऱ्हाडी भाषेत विपुल ग्रंथनिर्मिती झालेली आहे. तरीही वऱ्हाडी उपेक्षित आहे; कारण हे ग्रंथही बोलीभाषेच्या पुरस्कारामुळे उपेक्षेच्या भोवऱ्यात अडकले आहेत. तर विदर्भातील मान्यताप्राप्त साहित्य संस्थांनी आपण ह्या वऱ्हाडी भाषेचा कैवार घेतला तर आपल्यावर प्रादेशिकतेचा ठपका बसेल, असा धसका घेतला आहे की काय, असे वाटावे, अशी परिस्थिती आहे. त्यामुळे बोलीतील 'मेड इन इंडिया'सारखे पुस्तक पुण्यात गाजले तर गाजू शकते अथवा एखादे 'तिफन'सारखे गीत चित्रपटातून वा दूरदर्शनवरून प्रसारित झाले तर लोकांच्या तोंडी बसू शकते. अशी आज स्थिती आहे. तरीही वऱ्हाडी बोली ही प्राचीन आणि लययुक्त, लवचीक व गोड भाषा आहे. हे निर्विवाद.

■

३१, फुलोरा, नारायणनगर, दर्यापूर, जि. अमरावती ४४४ ८०३.

**कविमनाची भाषा**

बहिणाबाईंचं निसर्गाकडे पाहणं कसं होतं याचं एक बोलकं उदाहरण आहे. त्यांच्या शेतात विहिरीमागे एक आंब्याचं झाड होतं आणि विहिरीच्या धावेवर गुलमोहोराचं. कुणीतरी म्हटलं, "गुलमोहोराच्या झाडाचा उपयोग काय? याला फळं नाहीत. ना पोट भरे ना ओठ भरे." यावर बहिणाबाई म्हणाल्या "आंब्यानी पोट भरत असेल, पण गुलमोहोराच्या झाडानी डोळ्यांना सुख मिळतं आणि मन भरतं!" ■

# भारतीय साहित्य-विचारात वामनाचे योगदान

**वामन केशव लेले**

वामन हा 'काव्यालंकारसूत्राणि' ग्रंथाचा कर्ता. तो काश्मीरनिवासी होता, असे प्राच्यविद्याविशारद मानतात. जयापीड नावाचा काश्मीरचा राजा (काळ सन ७७९-८१३) अनेक कवींचा व पंडितांचा आश्रयदाता होता. वामन हा त्या राजाचा विद्वान मंत्री होता. अर्थात वामन इ.स.७७५-८१३ ह्या काळात होऊन गेला, असे मानता येते.

'काव्यालंकारसूत्राणि' हे वामनाच्या ग्रंथाचे नाव आहे. त्याचा अर्थ, गद्य-पद्यात्मक ललित साहित्याच्या सौंदर्याच्या स्वरूपाचे व घटकांचे तात्त्विक विवेचन करणारा सूत्रबद्ध शास्त्रीय ग्रंथ, असा आहे.

**ग्रंथाचे शास्त्रीय वर्गीकरण**

शास्त्रीय दृष्ट्या वामनाच्या ग्रंथाला लक्षणग्रंथ म्हणतात. लक्षण म्हणजे शास्त्र. ह्या अर्थाला प्रमाणे अशी :

अ) तन्त्रायुर्वेदः शाखा विद्या सूत्रं ज्ञानं शास्त्रं लक्षणं तंत्रम् इति अनर्थान्तरम् ।

चरकाने असे म्हटले आहे की, आपल्या चरकसंहितेत (आयुर्) वेद, शाखा, विद्या, सूत्र, ज्ञान, शास्त्र, लक्षण व तंत्र ह्या शब्दांच्या अर्थामध्ये अंतर म्हणजेच वेगळेपण नाही. ह्याचा अर्थ असा झाला की, लक्षण व शास्त्र हे शब्द एकाच अर्थाचे वाचक आहेत; ते समानार्थक शब्द आहेत.

आ) पूर्वशास्त्राणि संहृत्य प्रयोगान् उपलक्ष्य च ।
यथासामर्थ्यम् अस्माभिः क्रियते काव्यलक्षणम् ॥ (काव्यलक्षणम् १.२)

दण्डीने आपल्या काव्यलक्षणम् (त्याचेच दुसरे नाव काव्यादर्श असे आहे) नावाच्या प्रसिद्ध ग्रंथाच्या दुसऱ्याच कारिकेत असे म्हटले आहे की,

प्रस्तुत विषयावरील ह्या अगोदरचे शास्त्रीय ग्रंथ एकत्र करून आणि अभ्यासून तसेच निरनिराळ्या कवींच्या काव्यकृती बारकाईने वाचून मी स्वतःच्या बौद्धिक कुवतीनुसार काव्याचे हे शास्त्र (= शास्त्रीय ग्रंथ) रचत आहे. ह्यावरून लक्षण म्हणजे शास्त्र व तत्प्रतिपादक ग्रंथ, हा अर्थ निष्पन्न होतो. वामनाचा ग्रंथ काव्यशास्त्रीय ग्रंथ आहे. स्वतः वामनाने शास्त्र शब्दाचा प्रयोग खालील स्थळी केलेला



अनुक्रमणिका

आढळतो :

ते दोषगुणालंकारहानादाने शास्त्राद् अस्मात् । शास्त्रतो हिं ज्ञात्वा दोषान् जह्याद् गुणालंकारांश्च आददीत । (वामन पृ. २)

काव्यालंकारशास्त्रार्थः प्रसाद्यः कविपुंगवैः । (तत्रैव, पृ.३)

वामनाने आपल्या ह्या शास्त्रीय ग्रंथात काव्याचे शरीर, दोष, गुण, अलंकार व प्रयोगविशेष ह्या ढोबळ विषयांचे विवरण केले आहे. थोडक्यात, वामनाचा प्रस्तुत ग्रंथ 'लक्षणग्रंथ' ह्या वर्गात मोडतो.

लक्षण शब्दाचा अनुयोगी (=जोडीचा) शब्द 'लक्ष्य'. लक्ष्य म्हणजे कथा, नाटक, कविता इत्यादी ललित साहित्यकृती. उदा. शाकुंतलम्, रघुवंशम्, मेघदूतम् इत्यादी. हे ग्रंथ प्रतिभाशाली कवींनी लिहिलेले असून त्यांचे विषय, त्यांची मांडणी, भाषा, त्यांतील घटनाप्रसंगवर्णन, व्यक्तिदर्शन इत्यादींचा पृथक्करणात्मक अभ्यास करून जी तत्त्वे, नियम, वैशिष्ट्ये इत्यादी लक्षात आलेली असतात त्यांचे विषयोपविषयवार, पद्धतशीर, सांगोपांग, ऊहापोहपूर्वक व सोदाहरण विवेचन-निरूपण ही लक्षणग्रंथांची सामग्री असते. तिच्या आधारे लक्षणग्रंथ सिद्ध होतात. त्यावरून अगोदर लक्ष्यग्रंथ (=काव्य) आणि नंतर लक्षणग्रंथ (=शास्त्र) असा त्यांच्यात पौर्वापर्यसंबंध असतो. शिवाय, लक्ष्य ग्रंथ नसल्यास लक्षणग्रंथ सिद्ध होऊ शकत नाहीत, हेही ध्यानात येते.

लक्ष्य ग्रंथांच्या अभ्यासाची आवश्यकता केवळ लक्षणग्रंथकारांनाच असते असे नाही; तर ती होतकरू कवींनाही असते, हे लक्षात ठेवून वामन म्हणतो :

'तत्र काव्यपरिचयो लक्ष्यज्ञत्वम् ॥१२॥ अन्येषां काव्येषु परिचयो लक्ष्यज्ञत्वम् । ततो हि काव्यबंधस्य व्युत्पत्तिर्भवति ।' (वामन, पृ.११)

इतरांची काव्ये वाचल्यावर नवशिक्या कवीला काव्यरचनेच्या बारीकसारीक खुब्यांचे ज्ञान होते. ह्यावरून वामनाच्या ग्रंथाचे स्वरूप व महत्त्व यांचा बोध होतो.

**ग्रंथाची मांडणी : स्थूल आराखडा**

वामनाने आपला ग्रंथ सूत्रशैलीत लिहिलेला असून समग्र ग्रंथात एकूण ३२० सूत्रे आहेत. ती ५ अधिकरणांत व १२ अध्यायांत विभागलेली आहेत. पुढे दिलेल्या तालिकेवरून असे लक्षात येते की, शारीर नामक अधिकरणाच्या पहिल्या अध्यायात सर्वांत कमी म्हणजे केवळ ५ सूत्रे आहेत, तर प्रायोगिक नामक अधिकरणाच्या दुसऱ्या अध्यायात सर्वांत अधिक म्हणजे ९१ सूत्रे आहेत. त्या अध्यायात व्याकरणदृष्ट्या शब्दांची शुद्धता व अशुद्धता यांची चर्चा करण्यात आलेली आहे.

| अधिकरण क्रमांक | अधिकरणाचे नाव | अध्याय क्र. | सूत्र संख्या | अध्यायाचे नाव |
|---|---|---|---|---|
| १ | शारीर | १ | ०५ | प्रयोजनस्थापना |
| १ | शारीर | २ | २२ | अधिकारिचिन्ता रीतिनिश्चयश्च |
| १ | शारीर | ३ | ३२ | काव्यांगानि काव्यविशेषाश्च |
| २ | दोषदर्शन | १ | २२ | पदपदार्थदोषविभागः |
| २ | दोषदर्शन | २ | २४ | वाक्यवाक्यार्थदोषविभागः |
| ३ | गुणविवेचन | १ | २८ | गुणालंकारविवेकः शब्दगुणविवेकश्च |
| ३ | गुणविवेचन | २ | १५ | अर्थगुणविवेचनम् |
| ४ | आलंकारिक | १ | १० | शब्दालंकारविचारः |
| ४ | आलंकारिक | २ | २१ | उपमाविचारः |
| ४ | आलंकारिक | ३ | ३३ | उपमाप्रपंचाधिकारः |
| ५ | प्रायोगिक | १ | १७ | काव्यसमयः |
| ५ | प्रायोगिक | २ | ९१ | शब्दशुद्धिः |
| | **एकूण** | **१२** | **३२०** | |

ह्यावरून ह्या विषयाच्या विवेचनावर एकूण सूत्रांच्या २८% सूत्रे खर्ची पडली आहेत, हे जसे जाणवते तसेच हेही प्रतीत होते की, वामनाने ह्या विषयाला खूप महत्त्व दिले आहे. एका अध्यायाच्या विषयातून दुसऱ्या अध्यायाचा विषय कसा उत्क्रांत होतो म्हणजेच, सर्व अध्याय अर्थदृष्ट्या कसे एकमेकांशी संबद्ध आहेत, ते वामनाने त्या त्या जागी निदर्शनास आणले आहे. त्यावरून त्याच्या एकूण बौद्धिक शिस्तीचा चांगला परिचय होतो.

**'सूत्र' व 'वृत्ति' शब्दांचा खुलासा**

वामनाने आपला ग्रंथ सूत्रशैलीत लिहिला असल्याचे वर म्हटलेच आहे. भारतीय साहित्यसौंदर्यशास्त्राच्या कालानुक्रमी इतिहासातील हा पहिलाच सूत्रात्मक ग्रंथ आहे. (उत्तरकाळात रुय्यकाचा अलंकारसर्वस्व, हेमचन्द्रप्रणीत काव्यानुशासन, वाग्भटविरचित काव्यानुशासन, शोभाकरमित्ररचित अलंकार-रत्नाकर इत्यादी काही सूत्रमय ग्रंथांची रचना झाली.)

अ) सूत्र शब्दाचे भामहकृत लक्षण असे :

अल्पाक्षरं असन्दिग्धं सारवत् विश्वतोमुखम् ।
सम्यक् संसूचितार्थं यत् तत् सूत्रं इति कथ्यते ॥

म्हणजे ज्यात थोडी अक्षरे असतात, जे अर्थदृष्ट्या निःसंदिग्ध असते, जे सारांशरूप असून सर्वतोगामी किंवा सर्वस्पर्शी असते आणि ज्यात अर्थ उत्तम प्रकारे सूचित केलेला असतो त्याला (म्हणजे तशा वचनाला) सूत्र असे म्हणतात. थोडक्यात प्रतिपाद्य अर्थ अगदी मोजक्या, असंदिग्ध व अर्थपूर्ण शब्दांत सूत्रामध्ये व्यक्त केलेला असतो. सूत्रे ही लक्षात ठेवावयास व शिकवावयास सुलभ असतात. पूर्वी सर्व विषयांचे अध्यापन गुरुमुख-पद्धतीने होत असे. आचार्य शिष्यांना सूत्रे ऐकवून त्यावर विवरण करत असत आणि शिष्य ती सूत्रे मुखोद्‌गत करून त्यांवरील विवरण लक्षात ठेवत असत. ज्ञानदानाची व ज्ञानार्जनाची ही पद्धती उभयपक्षी उपकारक व सहजसोपी होती.

वामनाच्या ग्रंथात एकूण ३२० सूत्रे असून त्यांपैकी कलाशास्त्रेभ्यः (वामन, पृ.१०) अरूढार्थत्वात् (तत्रैव, पृ.२१) ह्या सूत्रांत फक्त एकच शब्द आहे. रीतिरात्मा काव्यस्य । (तत्रैव, पृ.४), विशेषो गुणात्मा (तत्रैव), लोकवृत्तं लोकः (तत्रैव, पृ.९), कवित्वबीजं प्रतिभानम् (तत्रैव, पृ.१२), पूर्वे नित्याः (तत्रैव, पृ. ३२) इत्यादी अनेक सूत्रे द्विशब्दी आहेत. तर खालीलसारखी काही अनेकशब्दयुक्त व लांबलचक आहेत.

शब्दस्मृत्यभिधानकोशच्छन्दोविचितिकलाकामशास्त्रदण्डनीतिपूर्वा विद्याः। (तत्रैव, पृ.९);

ओजःप्रसादश्लेषसमतासमाधिमाधुर्यसौकुमार्योदारताऽर्थव्यक्तिकान्तयो बन्धगुणाः । (तत्रैव, पृ.३२).

काही सूत्रांत चार किंवा पाच शब्दही आहेत.

**आ) 'वृत्ति'** - वामनाने आपल्या ग्रंथावर स्वतःच वृत्ती लिहिली आहे. त्याने म्हटलेच आहे :

प्रणम्य परमं ज्योतिर् वामनेन कविप्रिया ।
काव्यालंकारसूत्राणां स्वेषां वृत्तिर् विधीयते ॥(वामन, पृ.१)

म्हणजे परमज्योतिर्मय परमेश्वराला प्रणाम करून शास्त्रकार वामनद्वारा स्वरचित काव्यालंकारसूत्रांवरील कविप्रिया नामक वृत्ती रचली जात आहे.

आपली ही 'वृत्ती' कवींना प्रिय वाटेल असा वामनाचा आत्मविश्वास दिसतो. भामहाने 'वृत्ति' शब्दाचे लक्षण 'सूत्रमात्रस्य या व्याख्या सा वृत्तिर् अभिधीयते ।' ह्या शब्दांत केले आहे. फक्त सूत्राच्या (म्हणजे सूत्रात वापरलेल्या) शब्दांच्या स्पष्टीकरणाला वृत्ती असे म्हणतात. उदाहरणार्थ :

'विशिष्टा पदरचना रीतिः ।' (वामन, पृ.४) हे सूत्र आहे. ह्यावरील 'वृत्ति' अशी :

'विशेषवती पदानां रचना रीतिः ।' (तत्रैव) म्हणजे शब्दार्थांच्या विशेषयुक्त रचनेला रीती म्हणतात. ह्या वृत्तीत सूत्रातील 'विशिष्टा' शब्दाचे 'विशेषवती' शब्दाद्वारे स्पष्टीकरण केले आहे. मूळ सूत्रातील 'पदरचना' ह्या सामासिक शब्दाची 'पदानां रचना' अशी फोड करून दाखवली आहे. अशा प्रकारे ह्या वृत्तीत सूत्रातील फक्त शब्दार्थांचे स्पष्टीकरण झाले आहे. वृत्तीला विवरण असेही म्हणतात. विवरणाचे लक्षण 'तत्समानार्थकपदान्तरेण तदर्थकथनम ।' (सर्वतंत्रसिद्धान्तपदार्थलक्षणसंग्रहः, पृ.१८७) असे असून त्याचा अर्थ 'मूळ सूत्रातला अर्थ दुसऱ्या समानार्थक शब्दांनी सांगणे' असा आहे.

परंतु वामनाची वृत्ती इतकी मर्यादित स्वरूपाची नाही. काही ठिकाणी वामनाने प्रतिपाद्य विषयाचे विस्तृत स्पष्टीकरण केले आहे (उदा. वामन, पृ.९,२५-२६ इ.). काही ठिकाणी प्रतिपक्षाच्या आक्षेपाची स्वतःच पूर्वकल्पना करून त्याचे खंडन केले आहे (उदा. तत्रैव, पृ.३३). काही ठिकाणी आक्षेपकांचा युक्तिवाद पूर्वपक्षाच्या रूपाने उद्धृत करून त्याचा बिनतोड युक्तिवादाद्वारे उत्तरपक्ष केला आहे. (उदा. तत्रैव, पृ. ३५). काही ठिकाणी आपण प्रतिपाद्य विषयाच्या बाबतीत सिद्धपरमतानुवादी कसे आहोत ते नमूद केले आहे (उदा.तत्रैव, पृ.८०-८१). तर काही ठिकाणी मूळ कवींच्या काव्याच्या नकलनविसाने कसा प्रमाद करून ठेवला आहे, त्याचीही नोंद केली आहे (उदा. तत्रैव, पृ.८९). त्याशिवाय त्याने जागोजागी शास्त्रीय विषयाचे संक्षिप्त स्वरूपात प्रतिपादन करणारे अनेक श्लोक उद्धृत केले आहेत (उदा. तत्रैव, पृ.२, ६, १२, १५, ३२, ३७, ४७, ५१ इ.). तात्पर्य वामनाची वृत्ती सापेक्षतया विस्तृत आहे.

**इ) उदाहरणे** - उचित आणि विपुल उदाहरणे हा वामनाच्या ग्रंथाचा तिसरा स्पृहणीय घटक आहे. वामनाने आपल्या ग्रंथाच्या पहिल्या अकरा अध्यायांत स्वतःची व इतर कवींची मिळून सुमारे २५० पद्ये उद्धृत केली आहेत. तो स्वतःच म्हणतो :

एभिर् निदर्शनैः स्वीयैः परकीयैश्च पुष्कलैः ।
शब्दवैचित्र्यगर्भा इयम् उपमा एव प्रपंचिता ॥ (तत्रैव, पृ.७६)

ह्यावरून दोन गोष्टी लक्षात येतात. पहिली ही, की तो स्वतः कवी होता. (म्हणजेच तो भामह, दण्डी, उद्भट इत्यादी पूर्वाचार्यांप्रमाणे कवि-काव्यमीमांसक

होता.) दुसरी गोष्ट अशी की, त्याचे स्वपूर्वकालीन ललित साहित्यकृतींचे विपुल वाचन होते. त्या सर्जनशील (creative) साहित्यकृतींत (literary works) अमरुशतक, उत्तररामचरित, कादम्बरी, किरातार्जुनीय, कुमारसंभव, मालतीमाधव, मृच्छकटिक, मेघदूत, रघुवंश, विक्रमोर्वशीय, वेणीसंहार, शाकुंतल, शिशुपालवध, हर्षचरित इत्यादी प्रख्यात काव्यनाटकादींचा समावेश होता. ह्या साहित्यकृतींचे भेदक बुद्धीने व रसिक मनाने वाचन करूनच वामनाने काव्यशास्त्रविषयक अनेक अभिनव संकल्पना मनात निश्चित करून त्यांचेच निरूपण आपल्या ग्रंथात केले आहे. अर्थात त्याचे शास्त्रीय विचार भरगच्च वाचनावर व चिंतनयुक्त व्यासंगावर आधारित आहेत. त्याने आपल्या ग्रंथाच्या बाराव्या म्हणजे अखेरच्या अध्यायात शब्दांची शुद्धाशुद्धता निश्चित करताना अक्षरशः शेकडो शब्दांची चर्चा केली आहे. त्या अध्यायावरून त्याच्या सूक्ष्म विश्लेषणपटुत्वाची उत्तम प्रतीती येते.

वामनाने समग्र ग्रंथात सर्वत्र शास्त्रकारोचित प्रौढ व प्रतिष्ठित भाषाच वापरली आहे. फक्त अवतरण ऐवजी अवतार शब्द वापरणाऱ्यांना आणि अवचयन ऐवजी अवचय असा शब्दप्रयोग करणाऱ्यांना बालिश म्हटले आहे. (तत्रैव, पृ.८८)

येथवर सूत्र, वृत्ती व उदाहरणे ह्या तिन्ही संज्ञांचा खुलासा केला. आता वामनाने ग्रंथात मांडलेल्या विषयांची नोंद करू.

**ग्रंथात मांडलेले विषय**

१ काव्याच्या अस्वाद्यतेचे कारण
२ काव्यशास्त्राचे कार्य
३ काव्याची दोन प्रयोजने
४ कविशिष्यांचे दोन प्रकार
५ रीतिसिद्धान्ताची प्रतिष्ठापना
६ वैदर्भीप्रभृती तीन रीती
७ वैदर्भीची श्रेष्ठता
८ गौडी-पांचालींची अग्राह्यता
९ शुद्धवैदर्भीची कल्पना
१० लोक, विद्या व प्रकीर्ण ही तीन काव्यांगे
११ विद्यान्तर्गत व्याकरण, कोश, छंदःशास्त्र इत्यादींचे विवेचन
१२ प्रकीर्णात गुरुशुश्रूषा, संस्करण, प्रतिभा इत्यादींची चर्चा

१३ काव्याचे गद्य व पद्य हे प्रमुख भेद
१४ गद्याचे वृत्तगन्धी, चूर्ण व उत्कलिकाप्राय हे पोटप्रकार
१५ गद्य-पद्याचे अनिबद्ध व निबद्ध असे प्रकार
१६ दीर्घकाव्यांत दशरूपक श्रेष्ठ
१७ दशरूपकापासून कथा-महाकाव्यांची उत्पत्ती
१८ दोष-संकल्पनेची स्थापना
१९ दोषांची पददोष, पदार्थदोष, वाक्यदोष व वाक्यार्थदोष अशी चतुर्विध विभागणी व एकूण २२ दोषांची चर्चा
२० गुण व अलंकार यांतील भेद
२१ ओज, प्रसाद इत्यादी १० शब्दगुण व तितकेच अर्थगुण यांचे विवेचन
२२ यमक व अनुप्रास या २ शब्दालंकारांची चर्चा
२३ उपमेची सकल-अर्थालंकार-मूलकता
२४ उपमेचे प्रकार, विषय व दोष यांचे निरूपण
२५ प्रतिवस्तूपमा-प्रभृती इतर अर्थालंकार उपमेचाच विस्तार आहेत ह्या भूमिकेचे प्रतिपादन
२६ प्रतिवस्तूपमाप्रभृती ३० अर्थालंकारांची चर्चा
२७ कवींनी पाळावयाच्या एकूण १७ काव्यसंकेतांचा ऊहापोह
२८ शेकडो शब्दांच्या व्याकरणिक शुद्धाशुद्धतेची चिकित्सा

**वामनाचे वैशिष्ट्यपूर्ण विचार**

वामनाने वरील विषयोपविषयांची चर्चा करताना खालील वैशिष्ट्यपूर्ण विचार व्यक्त केले आहेत.

१ काव्य अलंकारामुळे = सौंदर्यामुळे ग्राह्य = आस्वाद्य बनते. (वामन, पृ.२)
२ सौंदर्य = दोषांचे निवारण व गुणालंकारांचे ग्रहण. (तत्रैव)
३ सुंदर काव्याचे दृष्ट (= ऐहिक) प्रयोजन प्रीती (= उत्कट आनंद) हे असून अदृष्ट (= पारलौकिक्) प्रयोजन कीर्ती हे असते. (तत्रैव)
४ कवींनी कीर्ती मिळविण्यासाठी आणि दुष्कीर्ती टाळण्यासाठी काव्यालंकारशास्त्र प्रयत्नपूर्वक अभ्यासावे. (तत्रैव, पृ.३)
५ कवींचे विवेकी आणि अविवेकी असे दोन प्रकार असतात. (तत्रैव)
६ विवेकी कवी शिष्य होण्यास लायक असतात तर अविवेकी कविशिष्य नालायक असतात. (तत्रैव)

७ रीती हा काव्याचा आत्मा होय. (तत्रैव, पृ.४)
८ अर्थाने युक्त व प्रसादादी गुणांनी संपन्न अशा रचनेला रीती म्हणतात. (तत्रैव)
९ पांचाली ही वैदर्भी व गौडी ह्यांखेरीज तिसरी रीती आहे. (तत्रैव)
१० वैदर्भी ही सकल गुणांनी युक्त रीती आहे (तत्रैव, पृ.५), म्हणून ती ग्राह्य आहे. (तत्रैव, पृ.७)
११ गौडी व पांचाली ह्या अल्पगुणयुक्त म्हणून अग्राह्य होत. (तत्रैव)
१२ ज्या वैदर्भीत समास मुळीच नसतात तिला शुद्धवैदर्भी म्हणतात. (तत्रैव, पृ.८)
१३ वैदर्भीत व्यक्त केलेला अल्प अर्थही किंबहुना नीरस अर्थही हृदयंगम भासतो. (तत्रैव)
१४ काव्य शास्त्रपूर्वक असल्यामुळे काव्यरचनेपूर्वी शास्त्राभ्यास अपेक्षित असतो. (तत्रैव, पृ.९)
१५ कलावस्तूच्या यथार्थ वर्णनासाठी कलांचे तात्त्विक ज्ञान अत्यावश्यक असते. (तत्रैव, पृ.१०)
१६ काव्यात शृंगारविषयक वर्णनांचे प्रायः प्राचुर्य असते. (तत्रैव, पृ.११)
१७ दुसऱ्यांची काव्ये वाचल्याने काव्यरचनेच्या कौशल्याचे ज्ञान होते. (तत्रैव)
१८ काव्यरचनेचा सराव केल्याने कवित्वशक्तीचा प्रकर्ष होतो. (तत्रैव, पृ.१२)
१९ काव्यगुरूंच्या सान्निध्यपूर्ण सेवेच्या योगे होतकरू कवीत काव्यविद्या संक्रमित होते. (तत्रैव)
२० प्रतिभेवाचून काव्य निष्पन्नच होत नाही, झालेच तरी ते उपहासास पात्र ठरते. (तत्रैव)
२१ गद्याची वैशिष्ट्ये लक्षात येणे कठीण असते आणि गद्यरचना अवघड असते. (तत्रैव, पृ.१३)
२२ गद्याचे वृत्तगंधी, चूर्ण व उत्कलिकाप्राय असे तीन प्रकार असतात. (तत्रैव)
२३ गद्य व पद्य अशा उभयविध काव्यांचे अनिबद्ध आणि निबद्ध असे दोन प्रकार असतात. (तत्रैव)
२४ अनिबद्ध काव्य रचता येऊ लागले की त्यानंतर निबद्ध काव्य रचणे जमू लागते. (तत्रैव, पृ.१५)
२५ अनिबद्ध म्हणजेच असंकलित स्वरूपाच्या काव्यांत सौंदर्य नसते. (तत्रैव)

२६ निबद्ध काव्यांत दशरूपके अतिशय प्रशंसनीय असतात. (तत्रैव)
२७ कथा, आख्यायिका इत्यादी इतर काव्यप्रकार दशरूपकांपासून कल्पिलेले असतात. (तत्रैव)
२८ गुणांच्या विरुद्ध स्वरूपाचे व काव्याचे सौंदर्य नष्ट करणारे ते दोष. (तत्रैव, पृ.१६)
२९ पद-, पदार्थ-, वाक्य-, व वाक्यार्थ-निष्ठ असे चार प्रकारचे स्थूल दोष असून काही सूक्ष्म पदार्थदोष असतात. (तत्रैव, पृ.१६-३१)
३० एकार्थ (=पुनरुक्ती) दोषाचे सहा अपवाद असतात. (तत्रैव, पृ.२५-२७)
३१ काव्यात सौंदर्य उत्पन्न करणारे धर्म ते गुण. ते स्वतंत्रपणे (=अन्यनिरपेक्षपणे) काव्यात सौंदर्य उत्पन्न करण्यास सक्षम असतात. (तत्रैव, पृ.३१-३२)
३२ अलंकार हे गुणोत्पन्न शोभा वाढवतात, पण त्यांच्यात गुणनिरपेक्षपणे काव्यसौंदर्य उत्पन्न करण्याचे सामर्थ्य नसते. (तत्रैव, पृ.३२)
३३ गुण हे काव्याचे नित्य धर्म होत, तर अलंकार हे अनित्य धर्म होत. (तत्रैव)
३४ ओज व प्रसाद यांचा संप्लव (= संपृक्तता) ही अनुभवाने सिद्ध होतो. (तत्रैव, ३३)
३५ करुणरसपूर्ण प्रेक्षणीय काव्यांत (= नाटकादींत) सुख व दुःख या परस्परविरोधी भावनांच्या संपृक्ततेचा अनुभव रसिकांना येत असतो. (तत्रैव)
३६ गुण अविद्यमान, भ्रान्त किंवा पाठधर्म नाहीत. (तत्रैव, पृ.३८-३९)
३७ कधीकधी केवळ शब्दसमूहालाही वाक्य म्हणतात. (तत्रैव, पृ.३९)
३८ ज्या काव्यात सगळे गुण प्रतीत होतात ते आम्रपाक काव्य, ज्यात व्याकरणशुद्धता असते पण वर्ण्य विषय क्लिष्ट असतो ते वृन्ताकपाक काव्य व ज्यात दहा गुणांचा अभाव असतो ते अपार्थक काव्य. अशा प्रकारे काव्याचे सत्काव्य, कुकाव्य आणि अकाव्य असे तीन भेद संभवतात. (तत्रैव, पृ.४७)
३९ प्रयुक्त शब्दातील अक्षरे वेगवेगळ्या पद्धतींनी फोडल्याने उत्कृष्ट यमक होते व त्याचे शृंखला, परिवर्तक आणि चूर्ण असे तीन प्रकार असतात. (तत्रैव, पृ.५०-५२)
४० उपमा सर्व अलंकारांच्या मुळाशी असते. (तत्रैव, पृ.५४)
४१ उपमेचे लौकिकी व कल्पिता असे दोन भेद असतात. (तत्रैव, पृ.५४-५५)

४२ स्तुती, निन्दा आणि स्वरूपवर्णन हे उपमेचे तीन विषय होत. (तत्रैव, पृ.५६)

४३ ज्या उपमेत उपमेय व उपमान ह्यांत सादृश्य नसते ती उपमा नष्ट होते आणि तशी उपमा देणाराही नष्ट होतो. (तत्रैव,पृ.६१)

४४ अनेक उपमाने वापरल्याने अर्थाचा परिपोष होत नाही. (तत्रैव)

४५ उपमेत अतिशय (=गुणोत्कर्ष) इष्ट असतो पण तो अनुभवविरुद्ध असता कामा नये. (तत्रैव, पृ.६२)

४६ प्रतिवस्तूपमाप्रभृती अलंकार हा उपमेचाच विस्तार होय. (तत्रैव, पृ.६२-७६)

४७ अलंकारांचे काही अंश अलंकारांइतकेच सौंदर्यसंपन्न असल्यामुळे काव्यात योजनीय ठरतात. (तत्रैव, पृ.७६)

४८ कवींनी काही संकेत कटाक्षाने पाळावेत, उदा. एकच शब्द दोनदा प्रायः वापरू नये (तत्रैव, पृ.७७); कवितेच्या चरणाच्या आरंभी 'खलु' शब्द योजू नये (तत्रैव, पृ.७८); बहुव्रीही समासाचे ज्ञान करविणारा कर्मधारय समास व कर्मधारयाचे ज्ञान करविणारा बहुव्रीही समास वापरू नये (तत्रैव); नकारांद्वारे एक सकार सुचवावा (तत्रैव); संबंधसंबंधे षष्ठीचा वापर क्वचित करावा, सर्रास करू नये (तत्रैव, पृ.७९); अतिप्रयुक्त असेच देशी व लाक्षणिक शब्द काव्यात वापरावेत. (तत्रैव, पृ.७९-८०)

४९ अगोदर शब्दप्रयोग किंवा वाक्यप्रयोग जन्माला येतो, त्याला 'लक्ष्य' म्हणतात. त्याची व्यवस्था करण्यासाठी न्याय किंवा नियम मागाहून बनवला जातो. अर्थात न्याय हा नेहमी लक्ष्याचे अनुसरण करीत असतो. (तत्रैव, पृ.८१)

५० कवींनी नेहमी व्याकरणदृष्ट्या शुद्ध शब्दच योजावेत. (तत्रैव, पृ.९६)

**सौंदर्यसिद्धान्ताची ग्रंथव्यापिता : काव्यं ग्राह्यं अलंकारात् । सौन्दर्यं अलंकारः ।**

वामनाने ग्रंथाच्या प्रारंभीच 'काव्य अलंकारामुळे ग्राह्य म्हणजे आस्वाद्य बनते आणि अलंकार म्हणजे सौंदर्य (अर्थात काव्य सौंदर्यामुळे आस्वाद्य बनते-तत्रैव, पृ.२) असा व्यापक सिद्धान्त मांडून आपल्या एकूण समग्र ग्रंथाच्या रचनेचा रोखच सुचविला आहे. वामनाने त्या व्यापक सिद्धान्ताचा उल्लेख अनेक ठिकाणी करून त्याच्यावरील आपली अव्यभिचारी निष्ठाच व्यक्त केली आहे. उदाहरणार्थ,

१ दोषांचे निवारण करून व गुणालंकारांचे ग्रहण करून कवीने ते सौंदर्य साधावे (स दोषगुणालंकारहानादानाभ्याम्॥तत्रैव). या उपदेशाद्वारे त्याने दोषांचे निवारण हेही सौंदर्यनिर्मितीचे तितकेच सामर्थ्यशाली साधन आहे जितके

गुणालंकारांचे ग्रहण हे आहे, हे स्पष्ट केले आहे. अर्थात वामनाच्या मते दोषनिवारण हे सौंदर्यसिद्धीचे अभावरूप साधन व गुणालंकारग्रहण हे भावरूप साधन असे ठरते.

२ त्याच्या मते तत्काळ होणारा उत्कट आनंद हे सुंदर काव्याचे दृष्ट (= प्रत्यक्ष जाणवणारे व ऐहिक) प्रयोजन असून कवीला लाभणारी कीर्ती हे अदृष्ट (=बहुसंख्य कवींना मरणोत्तरच कीर्ती मिळते, म्हणजेच हे) पारलौकिक प्रयोजन आहे (काव्यं सद्यारु दृष्टप्रयोजनम् प्रीतिहेतुत्वात्। अदृष्टप्रयोजनं कीर्तिहेतुत्वात्। तत्रैव). म्हणजे वामनाने सुंदर काव्याच्याच प्रयोजनाचा विचार केला आहे, हे स्पष्ट होते.

३ वैदर्भी रीती वीणेच्या स्वरावलीसारखी सुंदर असते. (विपंचीस्वरसौभाग्या वैदर्भी रीतिरिष्यते । तत्रैव, पृ.५)

४ चूर्ण प्रकारच्या गद्यात लहानलहान व लालित्यपूर्ण सामासिक शब्द वापरलेले असतात. (अनाविद्धललितपदं चूर्णम् । तत्रैव, पृ.१४)

५ असंकलित स्वरूपाच्या (=सुट्या श्लोकांच्या स्वरूपाच्या) काव्यांत चारुता = सुंदरता नसते. (असंकलितरूपाणां काव्यानां नास्ति चारुता । तत्रैव, पृ.१५)

६ प्रदीर्घ काव्यांत दशरूपके कापडावर काढलेल्या चित्रांसारखी आकर्षक असतात. (तत्रैव)

७ कथा, आख्यायिका इत्यादी काव्यप्रकार दशरूपकाचाच सुंदर आविष्कार होत. (तत्रैव)

८ दोष हे काव्याचे सौंदर्य हिरावून घेतात (= नष्ट करतात) म्हणून त्याज्य ठरतात. (काव्यसौंदर्याक्षेपहेतवस्त्यागाय दोषा विज्ञातव्या । तत्रैव, पृ.१६)

९ गुण हे काव्यात सौंदर्य उत्पन्न करणारे धर्म होत. त्यांच्या ठायी अलंकारनिरपेक्षपणे सौंदर्य उत्पन्न करण्याची क्षमता असते. (काव्यशोभायाः कर्तारो धर्मा गुणाः॥ ... प्रसादादीनां तु केवलानामस्ति काव्यशोभाकरत्वम् । तत्रैव, पृ.३१-३२)

१० अलंकारांमध्ये स्वतंत्रपणे काव्यसौंदर्य उत्पन्न करण्याची क्षमता नसते. (तत्रैव, पृ.३२)

११ अलंकार गुणांनी उत्पादिलेले काव्यसौंदर्य वाढवतात. (तद् अतिशयहेतवस्तु अलंकाराः। तत्रैव)

१२ ज्यात सगळे गुण स्पष्टपणे प्रतीत होतात ते आम्रपाक काव्य. ते सत्काव्य.





अनुक्रमणिका

(गुणस्फुटत्वसाकल्यं काव्यपाकं प्रचक्षते। चूतस्य परिणामेन स च अयम् उपमीयते । तत्रैव, ४७)

१३ गुणांपासून काव्यशोभा उत्पन्न होते. अलंकार तिच्यात भर घालतात. (गुणनिर्वृत्या काव्यशोभा । तस्याश्च अतिशयहेतवः अलंकाराः । - तत्रैव)

१४ काव्यात योजलेल्या अक्षरांच्या भंगापासून (=अक्षरे फोडल्याने) उत्कृष्ट यमक बनते. (उत्कृष्टं खलु यमकं भङ्गाद् भवति। तत्रैव, पृ.५०)

१५ शृंखला प्रकारच्या यमकभंगात यमकाचे वैचित्र्य जाणवते. (तत्रैव)

१६ भंगामुळे यमके प्रकाशमान होतात = आकर्षक दिसतात (अप्राप्तचूर्णभङ्गानि यथास्थानस्थितान्यपि । अलकानीव नात्यर्थं यमकानि चकासति । तत्रैव, पृ.५२)

१७ मधुर वर्णांचा अनुप्रास श्रेयस्कर = उत्कृष्ट असतो. (अनुल्बणो वर्णानुप्रासः श्रेयान् । तत्रैव)

१८ असादृश्य दोषामुळे तद्युक्त उपमा नष्ट होते आणि ती रचणारा कवीही नष्ट होतो. (असादृश्यहता हिं उपमा । तन्निष्ठाश्च कवयः। तत्रैव, पृ.६१)

१९ उपमानांच्या संख्याधिक्याद्वारे काव्यसौंदर्याची हानी टाळता येत नाही. (न अपुष्टार्थत्वात् । तत्रैव, पृ.६१)

२० उपमेतील विरुद्ध अतिशय तिच्या सौंदर्याची हानीच करतो. (न विरुद्धः अतिशयः । तत्रैव, पृ.६२)

२१ जे अलंकारांचे लहान अंश सौंदर्यसंपन्न असतात तेही काव्यात वापरण्याजोगे ठरतात. (अलंकारैकदेशा ये मताः सौभाग्यभागिनः । तेऽपि अलंकारदेशीया योजनीयाः कवीश्वरैः ॥ तत्रैव, पृ.७६)

२२ एकच शब्द पुन्हा वापरला गेल्यास ऐकणाऱ्याचा विरस होतो. (नैकं पदं द्विः प्रयोज्यं प्रायेण । तत्रैव, पृ.७७)

२३ काव्याच्या गद्यभागात अपूर्ण छंदाचा प्रयोग करू नये. कारण तसे केल्यास गद्याची शोभा नष्ट होते. (गद्ये समाप्तप्रायं वृत्तं न विधेयम् । शोभाभ्रंशात् । तत्रैव, पृ.७८)

२४ अवतर ऐवजी अवतार म्हणणे किंवा अवचाय ऐवजी अवचय म्हणणे हे बालिशपणाचे लक्षण आहे. अर्थात अशा प्रयोगांमुळे काव्यसौंदर्याची हानी होते. (अवतर-अवचाय शब्दयोर् दीर्घऱ्हस्वत्वव्यत्यासः बालानाम् । तत्रैव, पृ.८८)

वरील तपशिलावरून हे लक्षात येते की वामनाने आपला ग्रंथ लिहावयास बसण्यापूर्वी 'काव्य हे सौंदर्यामुळे आस्वाद्य बनत असल्यामुळे कवीने त्या सौंदर्याचे जतन भावरूप व अभावरूप अशा उभयविध साधनांनी सतत केले पाहिजे आणि काव्यनिर्मितीच्या अगदी अखेरीपर्यंत काव्यसौंदर्याची जपणूक करण्याच्या आपल्या ब्रीदापासून रेसभरही ढळू नये', ही जी भूमिका मनाशी पक्की केली होती ती त्याने ग्रंथाच्या अखेरीपर्यंत अगदी निष्ठेने व दक्षतेने पाळली आहे आणि रसिक अभ्यासकांना तिची वेळोवेळी जाणीव करून दिली आहे. अशा प्रकारे सौंदर्यसिद्धान्त काव्यालंकारसूत्राणि ग्रंथात अथपासून इतिपर्यंत अनुस्यूत आहे.

**कविशिष्यांचे दोन प्रकार**

वामनाने आपल्या ग्रंथाच्या प्रथम अधिकरणाच्या दुसऱ्या अध्यायात 'अधिकारिचिन्ता' ह्या उपविषयाचा परामर्श घेतला आहे. ह्या विषयाला वाहिलेली एकूण पाच सूत्रे अशी :

१ अरोचकिनः सतृणाभ्यवहारिणश्च कवयः । (तत्रैव, पृ.३)

२ पूर्वे शिष्याः विवेकित्वात् । (तत्रैव)

३ नेतरे तद्विपर्ययात् । (तत्रैव)

४ न शास्त्रं अद्रव्येषु अर्थवत् । (तत्रैव, पृ.४)

५ न कतकं पंकप्रसादनाय । (तत्रैव)

आता वरील सूत्रांतील विचार क्रमाक्रमाने समजून घेऊ.

**१ व २ विवेकी व अविवेकी शिष्य**

अरोचकी शब्दाचा अर्थ चोखंदळपणे खाणारा, पदार्थांची चांगले-वाईट अशी निवड करून ग्रहण करणारा, असा आहे. ह्यालाच वामन विवेकी म्हणतो. विवेक (=नित्यानित्यवस्तुविवेचनम्) म्हणजे चांगल्यापासून वाईट वेगळे करून ते वर्ज्य करणे आणि चांगल्याचे ग्रहण करणे. ह्याच्या उलट वागणारा (=वाईटाची निवड करणारा, विवेकशून्य) तो अविवेकी. वामनापुढील प्रतिपाद्य मुद्दा असा आहे की, काव्यशास्त्राचे शिक्षण कोणाला द्यावे - सर्व प्रकारच्या शिष्यांना की फक्त विवेकी शिष्यांना? विवेकी शिष्य गुरुचरणांशी बसून एकाग्र चित्ताने गुरूकडून प्राप्त होणारे ज्ञान संपादन करतील, त्यावर चिंतन करतील आणि ज्ञानाचे रक्षण करून यथायोग्यपणे उपयोजन करतील. अर्थात अशा व्यक्तींवर केलेला ज्ञानसंस्कार वाया जाणार नाही. असे शिष्य गुरुपरंपराप्राप्त ज्ञान टिकवून धरून स्वतःच्या प्रज्ञेच्या व प्रयत्नांच्या साहाय्याने त्यात भर घालतील. म्हणून वामनाच्या मते असे विवेकी

पुरुष शिष्य = शासनीय = शिकवण्यास योग्य ठरतात.

'सुश्रुत'कारांनी उत्तम शिष्याच्या ठायी पुढील गुणांची अपेक्षा बाळगली आहे. 'विनय-शक्ति-बल-मेधा-धृति-स्मृति-मति-प्रतिपत्तियुक्तं ... प्रसन्नचित्तवाक्चेष्टं क्लेशसहं च भिषक् शिष्यं उपनयेत, अत विपरीतगुणं न उपनयेत । (सुश्रुतसंहिता २.३)

म्हणजे ज्याच्या अंगी विनम्रता, सामर्थ्य व उत्साह आहे, ज्याच्या बुद्धी, धारणा, स्मृती इत्यादी शक्ती तल्लख आहेत, ज्याचे मन प्रसन्न असून वाणी सुस्पष्ट आहे, ज्याच्या हालचालींत सौम्यता असून ज्ञानार्जनासाठी पडतील ते कष्ट सहन करण्याची ज्याची तयारी आहे अशा शिष्याला गुरूने आपल्यापाशी ठेवून घ्यावे. त्याच्या उलट, हे गुण ज्याच्या ठिकाणी नाहीत त्याला गुरूने जवळ करू नये.

सुश्रुतकारांनी शिष्याच्या पात्रतेविषयी ही जी अट सांगितली आहे ती केवळ वैद्यक व्यवसायाच्या शिष्याला लागू पडते असे नाही, तर ती कोणत्याही ज्ञानशाखेत शिष्य म्हणवून घेणाऱ्या व्यक्तीला लागू पडते. ह्यावरून वामनाने धरलेला विवेकित्वाचा आग्रह योग्यच आहे.

**३ नेतरे तद्विपर्ययात् = अविवेकी कविशिष्याला काव्यशास्त्र शिकवू नये.**

अविवेकी शिष्य ज्ञानग्रहणाला अपात्रच असतो. त्याच्या अविवेकीपणामुळे त्याच्यावर शिक्षणाचा संस्कार करणे शक्यच नसते. असा शिष्य गवतासकट सगळे काही भक्षण करणाऱ्या अविचारी माणसासारखा असतो. त्याचा तो अविचारी स्वभाव बदलणे अशक्य असते. (न च शीलं अपाकर्तुं शक्यम् । वामन, पृ.३)

गणपति-अथर्वशीर्षातही 'इदं अथर्वशीर्षं अशिष्याय न देयम्, यो यदि मोहाद् दास्यति सः पापीयान् भवति।' (म्हणजे हे अथर्वशीर्ष अपात्र शिष्याला शिकवू नये. जर कोणी मोहाखातर अशा अशिष्याला हे शिकवले तर तो (=शिकवणारा) पापाचा धनी होईल.) असाच उपदेश केला आहे. तो लक्षात घेता वामनाचा वरील युक्तिवाद योग्यच वाटतो.

**४ व ५ अयोग्य व्यक्तीला केलेले शास्त्रशिक्षण वाया जाते**

वामनाचे म्हणणे असे की, शास्त्रीय विषय किंवा ग्रंथ हे सर्वांनाच शिकवू नयेत; ज्यांना शिकवायचे त्यांची पात्रता अगोदर पारखावी. कारण शास्त्रे ही मूलतः गंभीर असल्यामुळे ती सर्वांना पेलत नाहीत. ती सर्वांसाठी रचलेली नसतातच. शास्त्रीय शिक्षण फक्त गुणसंपन्न व मेधावी शिष्याला उपयुक्त ठरते. ज्याप्रमाणे निवळी गढूळ पाणी स्वच्छ करते पण चिखल स्वच्छ करू शकत नाही त्याप्रमाणे

शास्त्र विचारशील व्यक्तीलाच पैलू पाडू शकते, अविचारी व्यक्तीला नाही. वामनाने ह्या दृष्टांताच्या साहाय्याने आपले प्रतिपाद्य अभ्यासकांना पटवण्याचा प्रयत्न केला आहे.

**कवीचा व्यासंग**

वामनाने ह्या विषयाचे विवरण 'काव्यांगानि' या पोटविषयाच्या अन्तर्गत केले आहे. त्याच्या मते काव्ये ही शास्त्रपूर्वक असल्यामुळे कवीने काव्यरचनेपूर्वी पुढील विषयांचा व्यासंग करावा :

लोको विद्या प्रकीर्णंच काव्याङ्गानि । (वामन, पृ.९)

अर्थात, कवीने लोकव्यवहार, निरनिराळी शास्त्रे व विद्या आणि काही अवांतर विषय यांचे कसून अध्ययन करावे. ह्या तीन ज्ञेयविषयशाखा समजून घेऊ.

**१ लोक :**

लोकवृत्तं लोकः॥ लोकः स्थावरजङ्गमात्मा तस्य वर्तनं वृत्तं इति । (तत्रैव) म्हणजे स्थावर व जंगम अशा उभयविध जगाच्या वर्तनव्यवहाराचे ज्ञान ते लोकज्ञान. नद्या, सागर, पर्वत, वृक्ष यांचा समावेश स्थावरात होतो आणि माणूस, पशुपक्षी, किडे-प्राणी इत्यादींचा समावेश जंगम जगात होतो. थोडक्यात, कवीने स्थावर सृष्टीची विविध स्थित्यंतरे आणि जंगम सृष्टीचे विविध व्यापार-व्यवहार, कृती-उक्ती आणि जीवनशैली यांचा प्रयत्नपूर्वक कसून अभ्यास करावा. ह्याचे कारण भामहाने पुढील शब्दांत सुचवले आहे.

न सः शब्दः न तद् वाच्यं न स न्यायो न सा कला ।<br>
जायते यन् न काव्याङ्गं अहो भारो महान् कवेः॥ (भामह, पृ.१०८)

म्हणजे - असा एकही शब्द नाही, एकही अर्थ नाही, एकही युक्तिवाद किंवा विचार नाही किंवा अशी एकही कला नाही की जी काव्याचा वर्ण्य विषय बनू शकत नाही. कवीवरील जबाबदारी किती मोठी असते पाहा!

**२ विद्या :**

वामनाने 'विद्या' या घटकात व्याकरण, शब्दकोश, छंदःशास्त्र, कलाशास्त्र, कामशास्त्र, अर्थशास्त्र व इतर विद्या यांचा समावेश केला आहे. (शब्दस्मृति-अभिधानकोषच्छन्दोविचिति - कलाकामशास्त्र -दण्डनीतिपूर्वा विद्याः । वामन, पृ.९)

व्याकरणाच्या ज्ञानापासून कोणते शब्द शुद्ध ते निश्चित करता येते. शब्दकोशाच्या आधारे शब्दांचे अचूक अर्थ ठरविता येतात. छंदःशास्त्राच्या

अभ्यासाने छंदोविषयक संशयांचे निरसन होते. कलाशास्त्रांच्या परिचयाच्या मदतीने कलाविषयांचे यथावत वर्णन करता येते. कामशास्त्राच्या अध्ययनाच्या साहाय्याने प्रेम हा विषय प्रभावीपणे हाताळता व रंगवता येतो. अर्थशास्त्राच्या ज्ञानाच्या मदतीने नायक-प्रतिनायक यांचे प्रत्ययकारी वर्णन करता येते आणि इतिहासादींच्या अभ्यासाच्या साहाय्याने ऐतिहासिक घटना-प्रसंग बिनचूकपणे शब्दांकित करता येतात. थोडक्यात, कवीला विविध शास्त्रांचे ज्ञान काव्यनिर्मितीच्या दृष्टीने आवश्यक व उपकारक असते.

**३ प्रकीर्ण :**

वामनाने ह्या सदरात इतरांच्या काव्यांचे वाचन (लक्ष्यज्ञत्वम्), काव्यरचनेचा सराव (अभियोगः), काव्यगुरूंकडून मार्गदर्शन घेणे (वृद्धसेवा), काव्यातील शब्दावली स्थिर होईपर्यंत शब्दांची काढघाल करीत राहणे (अवेक्षण), जन्मजात प्रतिभेची जोपासना करणे (प्रतिभानम्) आणि चित्ताची एकाग्रता (अवधानम्) ह्या घटकांचा अन्तर्भाव केला आहे. एकंदरीने प्राचीन काळातील सर्जनशील साहित्याच्या क्षेत्रातील शिकाऊ व्यक्तीकडून अनेक ज्ञानशाखांच्या तात्त्विक अभ्यासाची आणि काही कलाकौशल्यांच्या व्यावहारिक ज्ञानाची अपेक्षा बाळगली जात असे.

**काव्यनिर्मितीची प्रक्रिया**

वामनाने अवेक्षणम् ह्या कल्पनेच्या स्पष्टीकरणात ही प्रक्रिया उलगडून सांगितली आहे. त्याचे ते स्पष्टीकरण नीटपणे कळावे म्हणून त्याचा पूर्वसूरी जो भामह त्याने केलेले सूतोवाच प्रथमतः जाणून घेऊ. भामहाने पुढील शब्दांत ही प्रक्रिया वर्णिली आहे.

१ एतद् ग्राह्यं सुरभि कुसुमं ग्राम्यं एतन् निधेयम्
धत्ते शोभां विरचितमिदं स्थानं अस्य एतद् अस्य ।
मालाकारो रचयति यथा साधु विज्ञाय मालाम्
योज्यं काव्येषु अवहितधिया तद्वद् एव अभिधानम् ॥

म्हणजे - ज्याप्रमाणे एखादा माळी हे फूल ग्राह्य आहे, हे ग्राम्य असल्यामुळे बाजूला सारू या, हे फूल हारात गुंफल्यास शोभून दिसेल, ह्या फुलाचे हे स्थान व ह्या दुसऱ्या फुलाचे हे स्थान, असा विचार करून हार गुंफतो त्याप्रमाणे कवीने शब्दांची उत्तम प्रकारे पारख करून मग त्यांची काव्यात योजना करावी.

शब्दांची पारख करताना ते दोषहीन व गुणयुक्त आहेत हे बघावे, तसेच त्यांच्या काव्यरचनेतील स्थानांचा व सहचरित शब्दांचा उत्तम प्रकारे विचार करावा,

हे लक्षात घेऊन वामनाने 'अवेक्षण' मुद्द्याची मांडणी पुढीलप्रमाणे केली आहे.

२ पदाधानोद्धरणं अवेक्षणम् ॥१५॥

पदस्य आधानं न्यासः । उद्धरणम् अपसारणम् । तयोः खलु अवेक्षणम्।

अत्र श्लोकौ - आधानोद्धरणे तावद् यावद् दोलायते मनः।
पदस्य स्थापिते स्थैर्ये हन्त सिद्धा सरस्वती ॥
यत्पदानि त्यजन्ति एव परिवृत्तिसहिष्णुताम् ।
तं शब्दन्यासनिष्णाताः शब्दपाकं प्रचक्षते॥ (वामन, पृ.१२)

म्हणजे - कवितेत एखादा शब्द योजणे ह्या कृतीस आधान म्हणतात. योजलेला शब्द काढणे ह्या कृतीस उद्धरण म्हणतात. ह्या दोन कृतींच्या परामर्शाला अवेक्षण म्हणतात. ह्या संदर्भातील श्लोकांचा अर्थ असा - शब्द ठेवणे (किंवा योजणे) व योजलेला शब्द काढून त्याच्या जागी दुसरा शब्द योजणे ह्या कृती, मन जोवर योजलेला शब्द बरोबर की चूक ह्या संदेहाच्या हिंदोळ्यावर असते, तोवर चालू राहतात. एकदा मनाचा हा अनिश्चय संपला की सरस्वती प्रसन्न झाल्याचा आनंद होतो. काव्यात योजलेले शब्दच जणू बदल सहन न करण्याच्या स्थितीप्रत पोचतात. ह्या स्थितीला शब्दांची योजना करण्यात निष्णात असलेले पंडित शब्दपाक (=शब्दांची सर्वांगीण अचूकता किंवा समर्पकता Perfection of diction) असे म्हणतात. (याच धर्तीवर अर्थपाकाची = अर्थाची समर्पकता perfection of meaning कल्पना करता येते.)

कोणतीही व्यक्ती कोणतेही अर्थपूर्ण वाक्य किमान एकदा तरी त्यातील शब्दांची काढघाल केल्यावाचून बोलू किंवा लिहू शकत नसते (You can seldom utter or write a sentence - a meaningful sentence - before altering the words at least once) ह्या सर्वांना जाणवणाऱ्या अनुभवावर वर वर्णिलेली आधानोद्धरण-क्रिया आधारित आहे. ह्याविषयी पाश्चात्त्य शैलीशास्त्रज्ञांनी खूप विस्तृत व सखोल विवेचन केले आहे.

## ३ संस्करणाची चतुःसूत्री

वरील पद्धतीने शब्दांची जी काढ-घाल केली जाते तिच्यामागे काव्यरचना सर्वथा निर्दोष करणे व तिची गुणवत्ता वाढवणे हा हेतू असतो. ह्या हेतूच्या पूर्ततेसाठी जे संस्करण होते त्याला पाश्चात्त्य शैलीशास्त्रज्ञांनी polishing, revision किंवा refinement म्हटले आहे. ह्या संस्करणाच्या अंतर्गत होणाऱ्या चार प्रक्रिया राजशेखराने पुढील चतुःसूत्रीत सांगितल्या आहेत.

अधिकस्य त्यागः, न्यूनस्य पूरणम्, अन्यथास्थितस्य परिवर्तनम्, प्रस्मृतस्य अनुसन्धानम् च इति अर्हीनम् । (राजशेखर, पृ.५२)

म्हणजे अधिक पडलेल्या शब्दाचा वा अर्थाचा त्याग, न्यून वाटत असलेल्या शब्दाची वा अर्थाची परिपूर्ती, भलत्याच जागी वापरल्या गेलेल्या शब्दात वा अर्थात बदल करून त्याची योग्य जागी योजना आणि विस्मरणामुळे राहून गेलेल्या शब्दाची वा अर्थाची योजना ह्या चार प्रक्रियांद्वारे काव्य अहीन = निर्दोष होते.

राजशेखराने भामह व वामन यांच्या एतद्विषयक संकल्पनांना अतिशय संक्षिप्त व सुसूत्र स्वरूप दिले. हा शिस्तबद्ध सुसूत्रपणा पाश्चात्त्य शैलीशास्त्रीय विचारात आढळत नाही.

**काव्यविशेष = काव्यप्रकार**

१ वामनाने काव्यभेद ह्या अर्थी काव्यविशेष हा शब्द वापरला आहे. त्याने प्रथमतः, काव्यं गद्यं पद्यं च ॥२१॥

गद्यस्य पूर्वं निर्देशो दुर्लक्ष्यविषयत्वेन दुर्बन्धत्वात् । यथाहुः - गद्यं कवीनां निकषं वदन्ति । (वामन, पृ.१३) ह्या सूत्र-वृत्तींत काव्याचे गद्य व पद्य असे दोन मुख्य (रचनानिष्ठ) प्रकार असतात; गद्याचे विषय चटकन लक्षात येत नाहीत; (=गद्य कोठे वापरायचे ते नेमके लक्षात येत नाही) आणि गद्यरचना करणे कठीण असते ह्या दोन कारणांखातर (वरील सूत्रात) गद्याचा उल्लेख पहिल्यांदा केला आहे व मग पद्याचा केला आहे. म्हटलेच आहे - गद्यरचना करणे ही कवीची कसोटीच आहे.

ह्यावरून दोन-तीन गोष्टी प्रतीत होतात, त्या अशा : वामनाने गद्यपद्यात्मक मिश्र (उदा. नाटके, चंपूकाव्ये इत्यादी) रचनांचा साक्षात शब्दांनी उल्लेख केलेला नाही. (पुढे त्याने स्वतःच दशरूपकाची थोरवी गायली आहे, ह्यावरून त्याला गद्यपद्यमिश्ररचना निश्चितपणे ठाऊक होत्या). दुसरी गोष्ट अशी की, प्राचीन काळी गद्यरचनेची प्रथाच एकंदरीने कमी होती, अधिकांश लेखन पद्यातच होत असे. त्यामुळे गद्य कोणत्या विषयाच्या अभिव्यक्तीसाठी वापरावयाचे ते चटकन लक्षात येत नसे. तिसरी गोष्ट अशी, पद्याचं विषयक्षेत्र जवळजवळ सर्व-अनुभव-स्पर्शी होते आणि त्यामुळेच पद्यरचना करणे सोपे होते.

**२ गद्याचे तीन प्रकार**

वामनाने गद्याचे वृत्तगन्धी, चूर्ण व उत्कलिकाप्राय असे तीन भेद मानून (तत्रैव) त्यांचे स्वरूपवर्णन पुढीलप्रमाणे केले आहे.





अनुक्रमणिका

**२.१** पद्यभागवद् वृत्तगन्धि । ...यथा पातालतालुतलवासिषु दानवेषु । अत्र वसन्ततिलकाख्यस्य वृत्तस्य भागः प्रत्यभिज्ञायते॥ - म्हणजे - ज्या गद्यात पद्याचा भाग असून तो जाणवतो त्याला वृत्तगंधी (=वृत्तांच्या गंधाने युक्त) म्हणतात. येथे त, भ, ज, ज, ग, ग या गणांनी युक्त वसंततिलका या वृत्ताचा गंध येतो. (वामन, पृ.१४)

**२.२** अनाविद्धललितपदं चूर्णम् ॥२४॥ .... अदीर्घसमासानि ललितानि पदानि यस्मिन् तद् चूर्णं इति । यथा-अभ्यासो हि कर्मणां कौशलं आवहति । नहि सकृन्निपातमात्रेणोदबिन्दुरपि ग्रावणि निम्नतां आदधाति। (वामन, पृ.१४)

म्हणजे - ज्या गद्यात लहानलहान व लालित्यपूर्ण समास असतात त्याला चूर्ण म्हणतात. उदा. सरावाने कर्मात कौशल्य उतरते. एकदाच पाण्याचा थेंब दगडावर पडल्याने त्याला खड्डा पडत नाही.

**२.३** विपरीतं उत्कलिकाप्रायम् ॥२५॥ आविद्ध-उद्धत-पदं उत्कलिकाप्रायम्। (तत्रैव) आणि तिसऱ्या प्रकारच्या गद्याला उत्कलिकाप्राय म्हणतात व त्यात दीर्घ व अललित सामासिक शब्द असतात.

एकंदरीने वामनाने येथे समासनिष्ठा ही गद्याच्या विभाजनाची कसोटी लावली आहे.

**३ पद्याचे अनेक भेद असतात.**

वामन म्हणतो - पद्यं अनेकभेदम् ॥२६॥ पद्यं खलु अनेकेन सम-अर्धसम-विषमादिना भिन्नं भवति।

म्हणजे समवृत्ते, अर्धसमवृत्ते आणि विषमवृत्ते ह्या भेदकतत्त्वांच्या अनुसार पद्यकाव्याचे अनेक प्रकार होतात; वृत्तांची संख्या खूप असल्यामुळे त्यांच्या संख्येची गणना करण्यात स्वारस्य नाही. येथे वामनाने वृत्त ह्या कसोटीच्या आधारे पद्यकाव्याचे प्रकार नमूद केले आहेत.

**४ अनिबद्ध व निबद्ध काव्ये**

वामनाने ह्याबाबतीत महत्त्वपूर्ण विवेचन केले आहे, ते असे :

तद् अनिबद्धं निबद्धं च ॥२७॥

तद् इदं गद्यपद्यरूपं काव्यं अनिबद्धं निबद्धं च । अनयो : प्रसिद्धत्वात् लक्षणं नोक्तम् । (तत्रैव)

म्हणजे - गद्यरूप व पद्यरूप काव्याचे अनिबद्ध व निबद्ध असे प्रकार असतात. त्यांची लक्षणे प्रसिद्ध असल्यामुळे येथे सांगितली नाहीत.

वामनाने गद्यरूप अनिबद्ध (म्हणजे सुटे, परिच्छेदरूपी) व गद्यरूप निबद्ध (दीर्घ गद्यरचना) असे गद्याचे दोन आणि पद्यरूप अनिबद्ध (म्हणजे सुटे, स्वयंपूर्ण श्लोक) व पद्यरूप निबद्ध (खंडकाव्य, महाकाव्य इत्यादी दीर्घ रचना) असे पद्याचे दोन असे एकूण चार प्रकार नमूद केले आहेत. गद्यातील दीर्घरचना प्रसिद्ध असल्या तरी अनिबद्ध रचना प्रसिद्ध नाहीत. त्यामुळे गद्यरूप अनिबद्ध काव्याचे लक्षण वामनाने करावयास हवे होते, म्हणजे त्याची विचारसरणी कळली असती.

### ४ अनिबद्ध व निबद्ध काव्यांच्या रचनेचा क्रम

वामनाच्या मते अनिबद्ध गद्यपद्यात्मक काव्ये लिहिता येऊ लागली की नंतर निबद्ध गद्यपद्यात्मक काव्ये लिहिण्याचे कौशल्य हस्तगत होते. वामनाने एका उपमानाधारे म्हटले आहे.

क्रमसिद्धिस्तयोः स्रग्-उत्तंसवत् ॥२८॥

तयोर् इति अनिबद्धं निबद्धं च परामृश्यते । क्रमेण सिद्धिः क्रमसिद्धिः । अनिबद्धसिद्धौ निबद्धसिद्धिः स्रग्-उत्तंसवत् । यथा स्रजि मालायां सिद्धायां उत्तंसः शेखरः सिध्यतीति । (तत्रैव, १५)

म्हणजे माळ व मुकुट या क्रमाने अनिबद्ध व निबद्ध गद्यपद्यात्मक काव्ये रचता येतात. माळी प्रथमतः माळ गुंफण्याचे कौशल्य आत्मसात करतो. ते झाले की नंतर त्याला मुकुट बांधण्याचे कौशल्य हस्तगत होते. ह्यात जशी पहिल्यांदा माळ व नंतर मुकुट ह्या क्रमाने गुंफणी-बांधणी होते त्याप्रमाणेच अनिबद्ध अगोदर व निबद्ध नंतर अशा रचना होतात.

हा क्रम सांगण्यात वामनाचा असा हेतू दिसतो की, कोणताही लेखक एकदम (म्हणजे सुरुवातीलाच) दीर्घ रचना करू शकत नाही. तो प्रथमतः लहानलहान रचना करून व त्यात यश मिळवून, हाताला लेखनाचे आणि प्रतिभेला निर्मितीचे वळण देऊन मग मोठ्यामोठ्या रचना करू लागतो. वामनाने हे विवेचन काही स्वपूर्वकालीन कवींच्या अनुभवांच्या आधारे केलेले असावे. पण त्या विवेचनात मांडलेला मुद्दा निश्चितपणे पटणारा आहे.

भामह नावाच्या एका प्राचीन ग्रंथकाराने ६४ कलांची सूची नमूद केली आहे. तिच्यात माल्यगुंफविचित्रता व शेखरक्रिया या कलांचा निर्देश त्याच क्रमाने केला आहे. ह्यावरून वामनाच्या युक्तिवादाचे समर्थन होते. (वामन, पृ.१०, तळटीप३)

### ५ अनिबद्ध काव्यांत सौंदर्य नसते

काही काव्यशास्त्रकारांचे असे मत होते की, सत्काव्याचे खरे पर्यवसान

अनिबद्ध काव्यातच होते. त्यांचे हे मत उद्‌धृत करून त्यातील दोष दाखविताना वामन म्हणतो -

केचिद् अनिबद्ध एव पर्यवसिताः तद् दूषणार्थं आह -

न अनिबद्धं चकास्ति एकतेजःपरमाणुवत् ॥२९॥

न खलु अनिबद्धं काव्यं चकास्ति दीप्यते । यथा एकतेजःपरमाणुरिति । अत्र श्लोकः -

'असंकलितरूपाणां काव्यानां नास्ति चारुता । न प्रत्येकं प्रकाशन्ते तैजसाः परमाणवः ॥ (वामन, पृ.१५)

म्हणजे - अनिबद्ध काव्य जे तेजाच्या एका परमाणूसारखे असते, ते प्रकाशत नाही. अनिबद्ध काव्य प्रकाशत नाही म्हणजे झळाळत नाही. ते तेजाच्या एखाद्या परमाणूसारखे असते. ह्याबाबतीतील श्लोकाचा अर्थ असा आहे - असंकलित स्वरूपातील काव्यांमध्ये सुंदरता नसते. तेजाचे किंवा प्रकाशाचे परमाणू एकेकटे प्रकाशत नसतात.

प्राचीन काळात संस्कृत-प्राकृतादी भाषांत अक्षरशः हजारो अनिबद्ध (=मुक्तक) काव्ये रचली गेली होती. ती रसिकांना खूप आवडली होती. वामनासकट सर्व शास्त्रकारांनी त्यांच्यापैकी काही काव्ये उद्‌धृत करून त्यांची प्रशंसा केली होती आणि त्या काव्यांचे अनेक संग्रहही करण्यात आले होते. त्या साऱ्या गोष्टी ती काव्ये आस्वाद्य असल्याचे जाणवल्यावरूनच झाल्या होत्या हे उघड आहे. त्यामुळे केवळ मुक्तकादी अनिबद्ध काव्यातच सारे काव्यसौंदर्य असते हा प्रतिपक्षाचा आग्रह जितका प्रामादिक तितकाच वामनाचा 'अनिबद्ध काव्यात सौंदर्य नसते' हा टोकाचा विचारही प्रामादिक आहे. अनिबद्ध व निबद्ध ही दोन्ही प्रकारची काव्ये आपापल्या परींनी सुंदर असतात, हे खरे वास्तव आहे.

**६ दीर्घ काव्यांत दशरूपक श्रेष्ठ**

अनिबद्ध काव्याची चर्चा संपवल्यावर निबद्ध काव्याकडे वळून वामन पुढीलप्रमाणे विवेचन करतो : संदर्भेषु दशरूपकं श्रेयः ॥३०॥

संदर्भेषु प्रबंधेषु दशरूपकं नाटकादि श्रेयः । कस्मात् तद् आह -

तद्धि चित्रं चित्रपटवद् विशेषसाकल्यात् ॥३१॥

तद् दशरूपकं हि यस्माच् चित्रं चित्रपटवत् । विशेषाणां साकल्यात् । (तत्रैव)

म्हणजे - संदर्भांमध्ये अर्थात प्रबंधरूप काव्यांमध्ये दशरूपक म्हणजे नाटक, प्रकरण इत्यादी अधिक प्रशंसनीय होय. कारण ते (म्हणजे दशरूपक) कापडावर

रेखाटलेल्या व रंगवलेल्या चित्राप्रमाणे, वैशिष्ट्यांच्या समग्रतेमुळे, रमणीय असते.

दशरूपक म्हणजे, नाटक, प्रकरण इत्यादी दृश्य काव्याचे दहा प्रकार. नाटकात गद्यपद्यात्मक नाट्यवस्तू, गीत, वाद्य, नेपथ्य, अभिनय इत्यादी अनेक घटक असतात. त्यामुळे नाटक एखाद्या सुंदर चित्राप्रमाणे, वैचित्र्यपूर्ण असते. ते भिन्न अभिरुचीच्या रसिकांना एकाचवेळी परमसंतोष देते. नाट्यशास्त्रकार भरतानेही नाटक हे सर्व थरांच्या, सर्व वयांच्या व सर्व प्रकृतींच्या प्रेक्षकांना अत्यानंद देते असे म्हटले आहे (नाट्यशास्त्र III. २७/५७-५९,२७/६१, इ.). एकंदरीने सकल वैशिष्ट्यांच्या संयोगामुळे दशरूपक सर्व साहित्यप्रकारांत सुंदर असते हे वामनाचे म्हणणे पटण्यासारखेच आहे.

## ७ दशरूपकापासून इतर काव्यप्रकारांची उत्पत्ती

वामनाने प्रस्तुत विषयाच्या उपसंहारात 'दशरूपकापासून इतर काव्यप्रकारांची उत्पत्ती होते' असा विचार व्यक्त केला आहे. त्याची मूळ वचने अशी :

ततोऽन्यभेदक्लृप्तिः ॥३२॥

ततो दशरूपकाद् अन्येषां भेदानां क्लृप्तिः कल्पनम् इति । दशरूपकस्य एव हि इदं विलसितम् । यच्च कथाख्यायिके महाकाव्यं इति तल्लक्षणं च नातीव हृदयंगमं इति उपेक्षितं अस्माभिः । तद् अन्यतो ग्राह्यम्। (वामन, पृ.१५)

म्हणजे - 'ततो' म्हणजे दशरूपकापासून अन्य भेदांची कल्पना केली जाते. कारण हा सगळा दशरूपकाचाच विलास किंवा आविष्कार आहे. कथा, आख्यायिका, महाकाव्य इत्यादी स्वरूपाचे जे निबद्ध काव्य आहे त्याचे लक्षण आमच्या मते अतिमनोहर नसल्यामुळे ते आम्ही उपेक्षिले आहे. ते इतर ग्रंथांच्या अवलोकनाने समजून घ्यावे.

प्राचीन शास्त्रकारांनी डोंबिका, भाण, प्रस्थान, षिद्गक, भाणिका, प्रेरण, रामाक्रीड, हल्लीसक, रासक व रागकाव्य अशा एकूण दहा नृत्तात्मक प्रबंधांची चर्चा केली आहे. ही सर्व प्रबंधकाव्ये रूपकापासूनच उत्पन्न झालेली असून ती रूपकाचेच विलसित होय, असे मानण्यात गैर काहीच नाही. त्यामुळे वामनाच्या वरील विधानांपैकी विलसितम् पर्यंतची विधाने ग्राह्य ठरतात. पण कथा, आख्यायिका इत्यादी काव्यांची लक्षणे अहृद्य असल्यामुळे उपेक्षिली आहेत, हा वामनाचा युक्तिवाद शास्त्रकारोचित नाही. एखाद्या विषयाचे लक्षण हृदयंगम असो, नसो ते शास्त्रकाराने कर्तव्यबुद्धीने सांगितलेच पाहिजे; ते टाळता कामा नये. म्हणून वामनाच्या विचारांचा





अनुक्रमणिका

हा उत्तरार्ध ग्राह्य नाही. येथे प्रस्तुत मुद्द्याची चर्चा संपली.

**'पुनरुक्ति' वाक्यार्थदोषाची गुणास्पदता**

वामनाची प्रस्तुत विषयाची चर्चा त्याचे लक्ष्य-ग्रंथांचे वाचन किती सावध व सूक्ष्म आहे आणि त्याच्यावरील चिंतन किती मार्मिक आहे याची साक्ष पटवते.

वामनाने एकार्थ (=पुनरुक्ती) ह्या वाक्यार्थदोषाचे लक्षणोदाहरण सादर केल्यानंतर काही विशेष अर्थ व्यक्त करण्याची इच्छा असेल तर तेथे एकार्थ हा दोष ठरत नाही, (न गतार्थं दुष्टं विशेषश्चेत् प्रतिपाद्यः । - वामन, पृ.२६) अशी प्रस्तावना करून प्रतिपत्ती, संनिधी, शुद्धी, उत्कर्ष, तादूप्य व विशेषण हे सहा विशेष अर्थ नमूद करून त्यांची उदाहरणे सादर केली आहेत. त्यांचा तपशील असा :

**१ प्रतिपत्ती** -

'धनुर्ज्याध्वनौ' ह्या शब्दप्रयोगात 'ज्या' म्हणजे धनुष्याची दोरी हा शब्द वापरलेला असूनही 'धनु' (=धनुष्य) हा शब्दही वापरलेला आहे. ह्यात पुनरुक्ती झाली असली तरी 'धनुष्यावर चढवलेली दोरी' या अर्थाचे ज्ञान व्हावे म्हणून ती पुनरुक्ती जाणूनबुजून केली आहे. ती दोषरूप नाही.

**२ संनिधी** -

**'कर्णावतंस'** शब्दातील 'अवतंस'चा अर्थ कर्णभूषण असा आहे. त्यामुळे 'कर्णावतंस' शब्दातील कर्ण शब्द पुनरुक्त वाटतो. पण कर्णभूषण (पेटीत वगैरे ठेवलेले नसून) कानात घातलेले आहे म्हणजे ते कानाच्या संनिध आहे, हे सांगावयाचे असल्यामुळे येथे पुनरुक्ती दोष मानत नाहीत.

**३ शुद्धी** -

**मुक्ताहार** शब्दातील मुक्ता शब्द हार शब्दामुळे पुनरुक्त ठरतो. पण शुद्ध मोत्यांचा हार असा विशेष अर्थ प्रतिपादावयाचा असल्यामुळे मुक्ता शब्द आवश्यक ठरतो, पुनरुक्त ठरत नाही.

**४ उत्कर्ष** -

**पुष्पमाला** शब्दातील माला शब्दाच्या प्रयोगामुळे पुष्प शब्द पुनरुक्त ठरतो. पण येथे उत्कृष्ट फुलांची माळ हा विशेष अर्थ प्रतिपादावयाचा असल्यामुळे पुष्प शब्द आवश्यक ठरतो. रत्नमाला, शब्दमाला इत्यादी शब्दांतील माला शब्दाचा प्रयोग औपचारिक असतो. वस्तुतः केवल माला शब्दाचा अर्थ विशिष्ट अशी पुष्परचना हाच आहे.

५ ताद्रूप्य -

**'करिकलभ'** शब्दातील करीचा अर्थ हत्ती असा असून कलभ शब्दाचा अर्थ 'हत्तीचे पिलू' असा असल्यामुळे करिकलभातील 'करिं' शब्द पुनरुक्त ठरतो. पण प्रौढ हत्तीसारखे हत्तीचे पिलू हा (अर्थविशेष=) ताद्रूप्यबोधक अर्थ प्रतिपादावयाचा असल्यामुळे 'करिं' शब्द पुनरुक्त नाही.

६ **विशेषण** -

'जगाद मधुरां वाचं विशदाक्षरशालिनीम्।' (अर्थात, तो सुस्पष्ट अक्षरोच्चारांनी शोभिवंत व मधुर अशा भाषेत बोलला) यातील जगाद (बोलला) ह्या क्रियापदाच्या प्रयोगामुळे वाचं शब्द पुनरुक्त आहे. पण वक्त्याला मधुर ह्या विशेषणाचा विशेषत्वाने बोध करवून द्यावयाचा आहे. म्हणून त्याने वाचं शब्द सहेतुकपणे वापरला आहे. तो एकार्थ नाही.

वामनाने शेवटी असा उपदेश केला आहे की, वरीलसारखे 'पुनरुक्त' शब्दप्रयोग प्राचीन कवींनी केले आहेत, तेवढेच ग्राह्य मानावेत. ह्या धर्तीवर अर्वाचीनांनी एकार्थपर शब्दप्रयोग (उदा.उष्ट्रकलभ) करू नयेत.

**गुणांची नित्यता व अनिवार्यता**

१ वामनाच्या मते गुण हे काव्यात सौंदर्य उत्पन्न करणारे धर्म असून केवळ ते अलंकारनिरपेक्षपणे काव्यात सौंदर्य उत्पन्न करण्यास समर्थ असतात. वामनाने हा विचार अन्वयव्यतिरेकाने खालील श्लोकात मांडला आहे :

युवतेर् इव रूपं अङ्ग काव्यं स्वदते शुद्धगुणं तदप्यतीव ।
विहितप्रणयं निरन्तराभिः सदलंकारविकल्पकल्पनाभिः॥
यदि भवति वचश्च्युतं गुणेभ्यो वपुरिव यौवनवन्ध्यं अंगनायाः।
अपि जनदयितानि दुर्भगत्वं नियतं अलंकरणानि संश्रयन्ते ॥ (वामन, पृ.३२)

म्हणजे - केवल शुद्ध गुणांनी युक्त काव्य, तरुणीच्या निरलंकृत स्वरूपाप्रमाणे, अतिशय मनोरम असते. ज्या काव्यात प्रसादादी गुण नसतात ते काव्य स्त्रीच्या तारुण्यरहित शरीराप्रमाणे सौंदर्यशून्य असते. गुण हे काव्यात समवायसंबंधाने असतात. मानवी शरीराच्या कातडीचा रंग जसा कातडीशी पूर्णपणे एकजीव झालेला असून, तो कातडीपासून वेगळा काढता येत नाही, तसे शब्दगुण व अर्थगुण काव्याच्या जन्मापासून त्याच्याशी संलग्न असतात. ते काव्याशी नित्य संबद्ध असतात. अलंकार हे काव्यात संयोगसंबंधाने विद्यमान असतात. म्हणून ते अनित्य असतात. गुण व अलंकार यांतील हा भेद लक्षात घेऊनच वामनाने गुणांना काव्याचे

नित्य व अनिवार्य धर्म मानले आहे.

**२ गुण सद्वेद्य, निष्कंप व सर्वत्र न दिसणारे असतात.**

गुण रसिकांना जाणवतात (नासन्तः, सद्वेद्यत्वात् । तत्रैव, पृ.३८), यांची प्रतीती रसिकांना निष्कंपपणे येते (न भ्रान्ताः, निष्कम्पत्वात् । तत्रैव, पृ.३९) आणि हे काव्यपाठाचे धर्म नव्हेत, कारण हे सर्वत्र आढळत नाहीत. (न पाठधर्माः, सर्वत्र अदृष्टेः । तत्रैव). गुण हे ह्या वैशिष्ट्यांनी युक्त असतात. ह्या तीन कारणांखातर गुण अनिवार्य ठरतात.

**अर्थगुण ओज**

वामनाने अर्थगुण ओजाची 'अर्थाची म्हणजे वर्ण्यविषयाची प्रौढता म्हणजे अर्थगुण ओज' अशी व्याख्या करून (अर्थस्य अभिधेयस्य प्रौढिः प्रौढत्वं ओजः। - तत्रैव, पृ.३९) त्या गुणाची पुढीलप्रमाणे पाच स्वरूपे कल्पिली आहेत :

पदार्थे वाक्यवचनं वाक्यार्थे च पदाभिधा ।
प्रौढिर्व्याससमासौ च साभिप्रायत्वं अस्य च ॥ (तत्रैव)

म्हणजे, १. शब्दार्थ व्यक्त करावयाचा असता वाक्याची योजना करणे,
२. वाक्याचा अर्थ व्यक्त कर्तव्य असता शब्दाचा प्रयोग करणे,
३. वाक्यार्थ विस्ताराने व्यक्त करणे,
४. वाक्यार्थ संक्षिप्तपणे व्यक्त करणे आणि
५. वाक्यार्थ साभिप्राय व्यक्त करणे. ही पाच स्वरूपे क्रमशः समजून घेऊ.

**१ पदार्थे वाक्यवचनम् :**

चंद्र शब्दाने वाच्य असलेला अर्थ 'नयनसमुत्थं ज्योतिर् अत्रेः (-अत्रि ऋषींच्या डोळ्यापासून उत्पन्न झालेल्या ज्योतीप्रमाणे', अशा शब्दसमूहाने व्यक्त करणे.

**२ वाक्यार्थे पदाभिधा :**

'ही स्त्री स्वर्गीय नाही तर मर्त्यलोकीची आहे' (दिव्या इयं न भवति किं तु मानुषी - तत्रैव, पृ.४०) हा वाक्यरूप अर्थ 'निर्मिषति' (= तिच्या पापण्यांची उघडझाप होते. तत्रैव) या एका शब्दाने व्यक्त करणे.

**३ व्यास - वाक्यार्थ विस्ताराने व्यक्त करणे**

वामनाने दिलेले उदाहरणपद्य मनोरम आहे, ते असे :

अयं नानाकारो भवति सुखदुःखव्यतिकरः।
सुखं वा दुःखं वा भवति न भवत्येव च ततः।
पुनस्तस्माद् ऊर्ध्वं भवति सुखदुःखं किमपि तत्।

पुनस्तस्मादूर्ध्वं भवति न च दुःखं न च सुखम्॥ (तत्रैव)

अर्थात - सुख व दुःख यांचा परस्परसंबंध नाना प्रकारचा असतो. तो असा - सुख होत नाही, पण दुःख होते; दुःख होत नाही, परंतु सुख होते; त्यानंतर पुन्हा सुखही होते व दुःखही होते आणि अखेरीस सुखही होत नाही व दुःखही होत नाही.

**४ समास = वाक्यार्थ संक्षिप्तपणे सांगणे**

उदाहरणार्थ , ते हिमालयं आमन्त्र्य पुनःप्रेक्ष्य च शूलिनम्।
सिद्धं च अस्मै निवेद्य अर्थं तद्विसृष्टाः खं उद्ययुः ॥ (तत्रैव)

म्हणजे - ते सप्तर्षी हिमालयाशी सल्लामसलत करून आणि पुनः एकवार शंकराला भेटून आणि त्याला सिद्ध अर्थाचे निवेदन करून त्याचा निरोप घेते झाले (आणि) स्वर्गामध्ये निघून गेले.

वस्तुतः येथे सप्तर्षींच्या पाच कृतींचे वर्णन आहे. त्या 'च'कार व ल्यबन्त प्रयोग यांनी जोडल्या आहेत आणि एका श्लोकात वर्णिल्या आहेत. एवढ्याच अर्थाने हे समासरूप प्रौढीचे उदाहरण मानता येईल. मात्र त्यातील पाच उपवाक्ये ध्यानात घेतली तर प्रस्तुत पद्य व्यासरूप प्रौढीचेच उदाहरण ठरेल.

**५ साभिप्राय वाक्यार्थ**

ह्या स्वरूपाचे उदाहरणपद्य असे : 'सोऽयं संप्रति चन्द्रगुप्ततनयः चन्द्रप्रकाशो युवा । जातो भूपतिर् आश्रयः कृतधियां दिष्ट्या कृतार्थश्रमः ॥ (तत्रैव, पृ.४१)

अर्थात - तो हा विद्वानांचा आश्रयदाता, चंद्राप्रमाणे प्रकाशदायी व चंद्रगुप्त राजाचा तरुण पुत्र राजा झाला, ही सुदैवाची गोष्ट आहे.

ह्या पद्यात 'विद्वानांचा आश्रयदाता' हे शब्द 'त्याने सुबन्धूला आपला मंत्री नेमले आहे' ह्या घटनेची सूचना देणारे असल्यामुळे येथे साभिप्राय प्रौढी झाली आहे.

मात्र यातील 'साभिप्रायत्व' सामान्य वाचकाला कसे प्रतीत होईल हा प्रश्नच आहे. पण एकंदरीने वामनाने अर्थगुण ओजाविषयी अभिनव कल्पना केली आहे, हे निश्चित.

**उपमेचे दोन प्रकार : लौकिकी व कल्पिता**

**१ वामनाने उपमेचे दोन प्रकार पुढीलप्रमाणे मानले आहेत :**

उपमानेन उपमेयस्य गुणलेशतः साम्यं उपमा ॥ (तत्रैव, पृ.५४)

म्हणजे - उपमेयाचे उपमानाशी गुणाल्पत्वामुळे जे साम्य असते त्यास उपमा म्हणतात. हे लौकिकी उपमेचे लक्षण आहे आणि 'गुणबाहुल्यतश्च कल्पिता॥'

(तत्रैव) अर्थात, गुणांच्या बाहुल्यामुळे होणारी ती कल्पिता उपमा. ह्याबाबतीतील वृत्तीत वामनाने खालीलप्रमाणे खुलासा केला आहे :

गुणानां बाहुल्यं गुणबाहुल्यं तत उपमानोपमेयस्य साम्यात्कल्पितोपमा । कविभिः कल्पितत्वात् कल्पिता । पूर्वा तु लौकिकी । ननु कल्पिताया लोकप्रसिद्धि-अभावात् कथं उपमान-उपमेय-नियमः ।

गुणबाहुल्यस्य उत्कर्ष- अपकर्ष - कल्पनाभ्याम् । (तत्रैव, पृ.५५)

म्हणजे - गुणांचे बाहुल्य किंवा अनेकत्व ते गुणबाहुल्य. त्यामुळे उपमेय व उपमान ह्यांमध्ये जे साम्य प्रतीत होते त्यापासून कल्पितोपमा होते. कवींकडून कल्पिली जात असल्यामुळे तिला कल्पिता म्हणतात. पूर्वोक्त ती लौकिकी उपमा होय. ह्यावर आक्षेपकाची शंका अशी की (उपमेतील उपमान लोकप्रसिद्ध असले पाहिजे अशी जर अट स्वतः वामनानेच सांगितली आहे तर मग) कल्पितेमध्ये उपमानाच्या लोकप्रसिद्धीचा अभाव असल्यामुळे तिला, उपमेय व उपमान दोन्ही प्रसिद्ध असली पाहिजेत हा नियम, कसा लागू पडणार? ह्या प्रश्नाचे उत्तर वामन असे देतो की, गुणोत्कर्षयुक्त ते उपमान आणि गुणापकर्षयुक्त ते उपमेय अशा गुणबाहुल्याच्या दोन कल्पना केल्या की उपमेय-उपमान-नियम सिद्ध होतो.

वामनाचे हे विचार काहीसे विवाद्य वाटतात. पहिली गोष्ट अशी, उपमेय व उपमान ही दोन्ही लोकप्रसिद्ध असली पाहिजेत हा वामनाचा आग्रह मान्य केल्यास कवींना फक्त त्याच त्याच उपमा देत राहावे लागेल. खेरीज, प्रत्येक उपमेतील उपमेय हे वेगळे म्हणजे अप्रसिद्धच असते व तसेच असणार. कारण कवीला नवीन उपमेयाचे वर्णन कर्तव्य असते. शिवाय, उपमेय गुणदृष्ट्या अपकृष्ट असते हे मान्य केल्यास त्याचे साधर्म्य उपमानाशी दर्शवण्यात कवीला उत्साह कशाला वाटेल? उपमेत उपमानाला जितके महत्त्व असते तितकेच उपमेयालाही असते. कवीला उपमेय हे 'वर्ण्य' = वर्णनीय वाटत असल्यामुळेच तो उपमा द्यावयास प्रवृत्त होतो. हे सर्व विचारात घेता वामनाचे मत ग्राह्य वाटत नाही.

**२ कल्पितोपमेची उदाहरणे :**

अ) सद्यो मुण्डितमत्तहूणचिबुकप्रस्पर्धि नारङ्गकम । (तत्रैव)

म्हणजे - हे नारिंग (= संत्रे) नुकत्याच दाढी केलेल्या एखाद्या मद्यपी हूणाच्या हनुवटीसारखे दिसते.

आ) पाण्ड्योऽयं अंसार्पितलम्बहारः क्लृप्ताङ्गरागो नवचन्दनेन ।
आभाति बालातपरक्तसानुः सनिर्झरोद्गार इवाद्रिराजः ॥ (तत्रैव)

अर्थात - ज्याच्या गळ्यात लांब हार लोंबत आहे आणि ज्याने आपल्या शरीरावर ताज्या चंदनाचा लेप लावला आहे असा हा पांड्य देशाचा राजा, ज्याच्या अंगाखांद्यावरून अनेक झरे वाहत आहेत आणि ज्याची शिखरे प्रातःकालीन अरुण रंगाने लाल झाली आहेत, अशा पर्वतराजासारखा शोभून दिसतो.

ह्या कल्पितोपमेतील उपमानाच्या ठायी निर्झरविपुलत्व आणि अरुणत्व हे दोन गुण असल्याचे वर्णिले आहे. त्यांच्या आधारे कवीने पांड्य राजा पर्वतराजासारखा दिसतो, अशी कल्पना केली आहे. म्हणून ही कल्पितोपमा होय.

**काही प्रमुख काव्यसमय = काव्यसंकेत**

काव्य ही कला असल्यामुळे कलोपासकाने तिच्या तत्त्वांचा अभ्यासपूर्वक सराव करून ती आत्मसात करावयाची असते. म्हणूनच काव्यशास्त्रीय ग्रंथांचे स्वरूप तात्त्विक व प्रायोगिक असे उभयविध असते, ह्या वस्तुस्थितीचे भान ठेवून वामनाने आपल्या ग्रंथाच्या पाचव्या अधिकरणाच्या पहिल्या अध्यायात सोळा काव्यसमयांचे निरूपण केले आहे. त्यांपैकी निवडक काव्यसमयांची ओळख करून घेऊ.

**१ नैकं पदं द्विः प्रयोज्यं प्रायेण ।** (तत्रैव, पृ.७७)

म्हणजे - कवितेत तोच शब्द दोनदा सामान्यपणे योजू नये. अशी पुनरुक्ती वाचकाचा विरस करते, हा गर्भित हेतू. परंतु एखादा विशेष आशय व्यक्त करावयाचा असल्यास अशी शाब्दी पुनरुक्ती करावी. उदाहरणार्थ, संत हे सदासर्वदा संतच (=सात्त्विक महापुरुषच) असतात, ते दुष्ट होऊच शकत नाहीत हा अर्थ व्यक्त करावयाचा असताना सन्तः सन्तः (एव सन्ति) अशी द्विरुक्ती ग्राह्य ठरते.

**२ न पादादौ खल्वादयः ।** (तत्रैव, पृ.७८)

अर्थात - चरणाच्या सुरुवातीला खलु व त्या प्रकारचे शब्द वापरू नयेत. तसा प्रयोग असुखावह ठरतो. पण हन्त, बल इत्यादी शब्द चरणारंभी वापरण्यास हरकत नाही.

**३ न कर्मधारयो बहुव्रीहिप्रतिपत्तिकरः ॥७॥ ... तेन विपर्ययो व्याख्यातः ॥८॥ (तत्रैव)**

अर्थात - बहुव्रीही समासाचा प्रत्यय देववणारा कर्मधारय समास योजू नये. तसेच ह्याच्या उलट कर्मधारय समासाची प्रतीती करवणारा बहुव्रीही समास योजू नये.

असा प्रयोग केल्यास वाचक बुचकळ्यात पडतो, त्याला अर्थाविषयी संदेह

वाटतो. तो काव्यास्वादास बाधक ठरतो.

**४ संभाव्यनिषेधनिवर्तने द्वौ प्रतिषेधौ ।** (तत्रैव)

संभाव्य निषेधाचे निवारण करण्यासाठी दोन नकार योजावेत. कालिदासाच्या रघुवंशातील खालील पद्य पाहा :

अथांगराजाद् अवतार्य चक्षुर् याहि इति जन्यां अवदत् कुमारी ।

नासौ न काम्यो न च वेद सम्यग् द्रष्टुं न सा भिन्नरुचिर् हि लोकः ॥ (रघुवंश ६/३०)

म्हणजे - तिने अंगराजावरील आपली दृष्टी खालती वळवली आणि 'चला, पुढे जाऊ या' असे आपल्या दासीला म्हटले. हा (अंगराज) कमनीय नव्हता असे नाही. ती चांगले-वाईट चांगल्या प्रकारे जाणू शकत नव्हती (= तिला विवेक नव्हता) असेही नाही. जगात प्रत्येकाची आवडनिवड वेगळी असते, इतकेच. येथे 'असौ अंगराजः काम्यः एव' असे करणात्मक विधान न करता 'असौ अंगराजः काम्यः न इति न' असे दोन निषेध वापरून विधान केले आहे. इंग्रजीत Two negatives make an affirmative असे म्हणतातच.

**अतिप्रयुक्तं देशभाषापदम् ॥** (तत्रैव, पृ.७९)

देशी भाषांतील असेच शब्द संस्कृत कवितेत वापरावेत जे खूप मोठ्या प्रमाणावर वापरले जातात.

**तंत्रयुक्त्या**

सर्व ज्ञानशाखांतील प्राचीन शास्त्रे विशिष्ट शिस्तीचा किंवा पद्धतीचा अवलंब करून लिहिली गेलेली आहेत. त्या पद्धतीला 'तंत्रयुक्ति' असे स्थूल नाव आहे. तंत्र म्हणजे शास्त्र (हा शब्दार्थ ह्या अगोदरच्या म्हणजे क्रमांक ३च्या मुद्द्याच्या स्पष्टीकरणात दिलेला आहेच.) आणि युक्ती म्हणजे उपाय. ह्यावरून तंत्रयुक्ती म्हणजे शास्त्र = शास्त्रीय ग्रंथ रचण्याचे उपाय. ह्या उपायांच्या आधारे शास्त्रीय ग्रंथांची रचना होत असते म्हणून त्यांच्या अर्थनिरूपणासाठी व समीक्षणासाठी त्यांच्या ज्ञानाची नितांत आवश्यकता असते. ह्या उपायांत ३६ तंत्रयुक्त्या, १५ व्याख्या, ७ कल्पना, २० आश्रय व १७ ताच्छील्ये अशा एकूण ९५ घटकांचा समावेश होतो. तंत्रयुक्त्यांच्या बारीकबारीक छटा अनेक आहेत. इतक्या सगळ्या उपायांची चर्चा करणे शक्य नाही. म्हणून निवडक दहा उपायांचा परिचय करून घेऊ.

**१ अपदेश -**

काव्यं ग्राह्यम् अलंकारात् । (तत्रैव, पृ.२)

वामनोक्तीचा अर्थ 'काव्य अलंकारामुळे ग्राह्य (=आस्वाद्य) बनते' असा आहे. ह्या उक्तीत अलंकारामुळे ह्या पंचमी विभक्तीतील शब्दाद्वारे काव्याच्या ग्राह्यत्वाचे कारण सांगण्यात आले आहे. अशा कारणवाचकामुळे कार्य-कारण-संबंध स्पष्ट होतो. जेव्हा असा कारणवाचक शब्द वापरलेला असतो तेव्हा तेथे 'अपदेश' तंत्रोपाय वापरलेला आहे, असे म्हणतात.

**२ पदार्थ -**

सौन्दर्यम् अलङ्कारः । (तत्रैव)

वामनोक्तीचा अर्थ 'अलंकार म्हणजे सौंदर्य' असा आहे. वामनाने पूर्वीच्या सूत्रात वापरलेल्या अलंकार ह्या पदाचा (म्हणजे मराठीत शब्दाचा) अर्थ नमूद केला आहे. त्याच्या योगे अलंकार पदाच्या अर्थाचा बोध होतो. थोडक्यात, पदाचा अर्थ तो पदार्थ. हेच ह्या उपायाचे नावही आहे.

**३ निदर्शन -**

न शास्त्रं अद्रव्येषु अर्थवत् । ... न कतकं पङ्कप्रसादनाय । (तत्रैव, पृ.४)

वामनाच्या वचनांचा अर्थ 'अपात्र शिष्यांना (काव्यालंकार-)शास्त्र शिकवण्यात अर्थ नाही. निवळी (गढूळ पाणी शुद्ध करू शकते पण) चिखल शुद्ध करू शकत नाही.'

वामनाने काव्यालंकारशास्त्र विवेकी शिष्यांच्या उपयोगाचे असते, ते त्या शिष्यांवर संस्कार करू शकते; पण ते अविवेकी शिष्यांवर कोणताही संस्कार करू शकत नाही, हा विचार पटविताना निवळीचा व्यावहारिक दाखला दिला आहे. निवळीच्या ठायी गढूळ पाणी शुद्ध करण्याची क्षमता असते, पण चिखल शुद्ध करण्याची क्षमता नसते. ह्या दाखल्याच्या योगाने वामनाचा तात्त्विक विचार पटतो.

**४ पूर्वपक्ष -**

तद् आरोहणार्थं इतराभ्यासः इति एके । (तत्रैव, पृ.७)

वामनाचा आशय असा की, काही विचारवंतांचे असे मत आहे की, 'वैदर्भीत प्रावीण्य मिळविण्यासाठी गौडीया व पांचाली ह्या इतर दोन रीतींचा अभ्यास करावा.' तो अभ्यास वैदर्भीप्रावीण्याला उपकारक ठरेल.

**५ उत्तरपक्ष -**

तत्तु न । अतत्त्वशीलस्य तत्त्व-अनिष्पत्तेः । (तत्रैव)

वरील विचारवंतांचे म्हणणे फेटाळताना वामन म्हणतो : 'तसे करणे योग्य किंवा उपयोगाचे नाही. कारण अ-स्वरूपाच्या अभ्यासाने स्वरूपाच्या ज्ञानाची निष्पत्ती होत नसते.'

वामनाच्या मते वैदर्भी हे तत्त्व आणि गौडीया-पांचाली ह्या दोन्ही मिळून अतत्त्व. वामनाचा युक्तिवाद असा की, गौडीया-पांचालींचा अभ्यास करून वैदर्भीत प्रावीण्य कसे मिळू शकेल? वैदर्भीत प्रावीण्य मिळवण्यासाठी वैदर्भीचाच अभ्यास आवश्यक आहे. म्हणून पूर्वपक्षकारांची भूमिका अग्राह्य ठरते, हा निष्कर्ष.

**६ उद्देश** -

लोको विद्या प्रकीर्णं च काव्याङ्गानि । (तत्रैव, पृ.९)

वामनाच्या सूत्राचा अर्थ (स्थावरजंगमात्मक) लोक, (व्याकरणप्रभृती) विद्या (=शास्त्रे) व (ह्यांव्यतिरिक्त उरलेले इतर ज्ञेय विषय =) प्रकीर्ण या तिहींना काव्यांगे म्हणतात.

वामनाने प्रस्तुत सूत्रात तीन काव्यांगांचा फक्त उल्लेख करून त्यांचा स्थूल परिचय करून दिला आहे. शास्त्रकार अशा प्रकारे विषयघटकांचा जो नुसता परिचय करून देतो त्याला उद्देश म्हणतात. उद्देशाद्वारे शास्त्रकार पुढील विवेचनासाठी पार्श्वभूमी तयार करतो.

**७ निर्देश** -

शब्दस्मृति-अभिधानकोष-च्छन्दोविचिति - कलाकामशास्त्रदण्डनीतिपूर्वा विद्याः । (तत्रैव)

वरील प्रदीर्घ सामासिक शब्दांत व्याकरण, शब्दकोश, छंदःशास्त्र, कलाशास्त्र, कामशास्त्र व अर्थशास्त्र या शास्त्रांचा साक्षात शब्दांनी उल्लेख केला आहे. त्याच्या अगोदरच्या सूत्रात जो विद्या शब्द वापरण्यात आला आहे त्याचा हा विस्तृत उलगडा आहे. अशा विस्तारपूर्वक वचनाला निर्देश म्हणतात. वरील सूत्रात 'पूर्वा' हा इत्यादी, प्रभृती ह्या अर्थाचा शब्द वापरला आहे. त्यायोगे वाचकाने, व्याकरणादींसारख्या (म्हणजे त्या प्रकारच्या) इतर शास्त्रांचाही विद्यांत समावेश करून त्यांचाही अभ्यास कविशिष्याने करावा, अशा अर्थाचे ग्रहण करावयाचे आहे. अशा प्रकारच्या 'आदि आणि इति, इत्यादि, तथा, पूर्वा, प्रभृति व वा' हे शब्दही जेथे प्रयुक्त केलेले असतात तेथे 'प्रकार-ताच्छील्य' आहे असे तंत्रयुक्तिकार म्हणतात.

**८ उपमान -**

क्रमसिद्धिस् तयोः स्रग् उत्तंसवत् । (तत्रैव, पृ.१५)

वामनाच्या ह्या सूत्राचा अर्थ असा : ज्याप्रमाणे माळी प्रथमतः हार गुंफण्यात प्रावीण्य मिळवतो व तदनंतर मुकुट बांधण्यात कौशल्य हस्तगत करतो त्याप्रमाणे कवी प्रथमतः गद्यपद्यात्मक अनिबद्ध काव्य रचण्यात नैपुण्य संपादन करतो आणि तत्पश्चात दीर्घ काव्य-नाटके लिहिण्यात निष्णात बनतो. यात पहिल्यानंतर दुसरे असा क्रम असतो. त्या क्रमाचा मुद्दा स्पष्ट करण्यासाठी वामनाने वरीलप्रमाणे स्रग् उत्तंसवत् ही उपमा दिली आहे. ही शास्त्रीय विवेचनातील उपमा आहे. ती शास्त्रीय अर्थ विशद करण्यासाठी वापरलेली आहे. अशा शास्त्रीय उपमांना उपमान तंत्रयुक्ती म्हणतात. (काव्यातील उपमा काव्यार्थात सौंदर्य उत्पन्न करते, शास्त्रातील उपमान विषय सुबोध बनवते, हा दोहोंतील फरक आहे.)

**९ उद्धार -**

न अनिबद्धं चकास्ति एकतेजःपरमाणुवत् । (तत्रैव)

वामनरचित सूत्राचा अर्थ असा आहे : एकट्यादुकट्या तेजःपरमाणूप्रमाणे असलेले अनिबद्ध (=सुटे) काव्य प्रकाशत किंवा चमकत नाही. काही काव्यशास्त्रकार असे मानणारे होते की, सत्काव्यांचे पर्यवसान अनिबद्ध काव्यातच होते. (केचिद् अनिबद्ध एव पर्यवसिताः तद् दूषणार्थम् आह -)

वामनाला हा विचार पटत नाही. म्हणून त्यातील दोष दाखवून वामन आपले मत मांडतो. अशा कृतीला उद्धार तंत्रयुक्ती म्हणतात. येथे उद्धार शब्दाचे 'दुसऱ्याचे मत उखडून टाकणे' व 'आपले मत उचलून धरणे' असे दोन अर्थ आहेत. वरील सूत्रात अनिबद्ध काव्याची एकतेजः परमाणूशी तुलना केली आहे. ती शास्त्रीय आहे. त्या तुलनेत उपमान तंत्रयुक्ती आहे. अशा प्रकारे एकाच सूत्रात किंवा विधानात एकाहून अधिक तंत्रयुक्त्या असू शकतात.

**१० हेत्वर्थ -**

तद् हिं चित्रं चित्रपटवद् विशेषसाकल्यात् । (तत्रैव)

वामनाच्या प्रस्तुत वचनाचा अर्थ असा आहे : कारण ते (म्हणजे दशरूपक) कापडावर रंगवलेल्या चित्राप्रमाणे, वैशिष्ट्यांच्या समग्रतेमुळे, चित्र म्हणजे आकर्षक असते.

ह्या वचनात वामनाने 'हिं' हे अव्यय वापरले आहे. हे अव्यय तर्कशुद्ध कारण प्रतिपादण्याचे कार्य करते. ह्याच्या अगोदरच्या सूत्रात वामनाने 'प्रदीर्घ काव्यांत

दशरूपक श्रेष्ठ' (संदर्भेषु दशरूपकं श्रेयः) असा विचार मांडलेला आहे. त्याचे तर्कशुद्ध कारण सांगण्यासाठी त्याने 'हिं' हे अव्यय वापरले आहे (हे अव्यय कधीही वाक्यारंभी वापरत नसतात.) 'हिं' द्वारे सांगितल्या गेलेल्या कारणाला हेत्वर्थ तंत्रयुक्ती म्हणतात.

एखादा दिवा ज्याप्रमाणे संपूर्ण खोली उजळून टाकतो त्याप्रमाणे ह्या तंत्रयुक्त्या शास्त्रीय अर्थावर प्रकाश टाकून तो आकलनीय, निःसंदिग्ध, अचूक व विचारणीय किंवा स्वीकारणीय बनवतात. म्हणूनच काव्यशास्त्रावरील संस्कृत ग्रंथांच्या यथावत अध्ययन अध्यापनासाठी त्यांचे ज्ञान संपादन करून त्यांचे प्रत्यक्षात उपयोजन करावे लागते. ■

**ए - १२, सर्वत्र सोसायटी, पौड रस्ता, कोथरुड, पुणे ४११०२९**

## परिषदवार्ता

मराठी अभ्यास परिषद आणि बँक ऑफ महाराष्ट्र, यांच्यावतीने दिला जाणारा महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार यंदा "शैलीमीमांसा" या पुस्तकाला दिला गेला. डॉ. दिलीप धोंडगे यांचे हे पुस्तक शब्दालय प्रकाशन (श्रीरामपूर)ने प्रसिद्ध केले आहे. हा पुरस्कार ५००० रु. रकमेचा असून, डिसेंबर २००३ मध्ये पुणे येथे समारंभपूर्वक दिला गेला. पुरस्कारासाठी निवड करणाऱ्या समितीत प्रा. प्र. ना. परांजपे (निमंत्रक), डॉ. गं. ना. जोगळेकर आणि डॉ. विद्यागौरी टिळक यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

## सूचना फलक

२००३च्या दिवाळी अंकातील 'भाषांतराबाबत पुनश्चिंतन' या लेखाच्या अनुवादिकेचे, विजया देव यांचे, नाव अनुक्रमणिकेत द्यावयाचे राहून गेले आहे, याबद्दल दिलगिरी व्यक्त करीत आहोत. **- संपादक**

## निवेदन

'मराठी अभ्यास परिषदे'ने 'माध्यम - भाषा' या विषयीच्या अनुभवांचे संकलन व विश्लेषण करण्याचे योजले आहे. त्यासाठी पुढील माहिती मागवत आहोत.

१) ज्या भाषेतून शिक्षण घेतले, त्या भाषेविषयींचे आपले अनुभव ५०० ते १००० शब्दात लिहून कळवावेत.

२) त्या भाषेतून आपण किती वर्षे शिक्षण घेतले, ते नोंदवावे.

३) सोबत आपले नाव, वय, पत्ता, दूरध्वनी क्रमांक ही माहिती द्यावी.

संपर्क : डॉ. नीलिमा गुंडी, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद<br>
३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, पुणे - ४११ ००२<br>
दूरध्वनी : (०२०) २४४८६०१५

पुस्तक परीक्षण

# मराठी व्याकरणाच्या अभ्यासाची दिशा

लीला गोविलकर

**(पुस्तक : 'मराठी व्याकरणाचा अभ्यास', लेखक : डॉ. प्रकाश परब, प्रकाशक : ओरिएंट लॉंगमन, मुंबई, २००३, मूल्य : रु. ११०/-, पृष्ठ संख्या : १६०)**

पारंपरिक मराठी व्याकरणाचा अभ्यास शालेय व महाविद्यालयीन क्षेत्रात कालबाह्य होत असताना 'मराठी व्याकरणाचा अभ्यास' हे मराठी व्याकरणासंबंधीचे पुस्तक प्रकाशित होत आहे, ही कौतुकाची बाब आहे. या पुस्तकाने जशी विद्यार्थ्यांची गरज लक्षात घेतली तशीच परीक्षकांची सोयही, शेवटी प्रश्नसंच देऊन भागवली आहे. चिकित्सक अभ्यासकांना अभ्याससामग्री देऊन तत्त्वदृष्टी देणे हासुद्धा या लेखनामागे उद्देश आहे. पण एवढ्या मर्यादित पृष्ठसंख्येत हा उद्देश साध्य होणे अवघड आहे. तरीही लेखकाची धडपड व ऐतिहासिक माहितीची मदत घेत नवी तत्त्वदृष्टी देणारी मांडणी, या गोष्टी त्यांच्या व्याकरणविषयक जिज्ञासेची जाणीव करून देणाऱ्या आहेत.

एकंदर सहा प्रकरणांतून त्यांनी हा विषय मांडला आहे. भाषाविज्ञानाच्या वाढत्या प्रभावाची दखल घेऊन लेखकाने त्याचीही मदत घेतली आहे. पण भाषाविज्ञानाची पुरेशी समज विद्यार्थ्यांमध्ये रुजलेली व रुळलेली नसताना, भाषाविज्ञानातील पारिभाषिक संज्ञांचा आधार घेत केलेले विवरण म्हणजे 'एकादशीच्या घरी शिवरात्र'! इंग्रजीच्या व संस्कृतच्या व्याकरणांच्या अडथळ्यांच्या जोडीला हे तिसरे लोढणे मराठीच्या व्याकरणात गळ्यात आले आहे असा विद्यार्थ्यांचा समज होऊ शकतो. पारिभाषिक संज्ञांचा वापर न करता भाषावैज्ञानिक दृष्टिकोणाचा व ज्ञानाचा आधारही मराठीच्या व्याकरणात घेता येतो व मराठीच्या शब्द-वाक्यादी विचारांना त्याची मदत घेता येते.

प्रत्येक प्रकरणाचे रचनादृष्ट्या दोन विभाग जाणवतात. पहिला विभाग - सबनिसां (फार तर मंगरुळकरां) पर्यंतच्या मराठीच्या व्याकरणातील आढावा घेत दोषदिग्दर्शन करणे व दुसरा विभाग- लेखकाला प्रस्थापित करायचा असलेला नवा

दृष्टिकोण मांडणे. लेखकाने केवळ या दुसऱ्या विभागावरच लक्ष केंद्रित करून लेखन केले असते, तरी ते 'मराठीच्या व्याकरणाला' उपयुक्त ठरले असते. या नव्या दृष्टिकोणाच्या आधारे पूर्वीलांच्या मतांचे खंडन आपोआपच झाले असते. पण दुसऱ्या विभागामुळे व त्यातही तो प्रत्येक प्रकरणात प्रथम घेतल्याने, नवा विचार सुसंगतपणे पटवून देण्याकडे पुरेसे अवधान राहिले नाही. उदाहरणच द्यायचे झाले तर दुसऱ्या प्रकरणातील 'व्याकरणातील प्रयोगशरणता' यासंबंधाचे देता येईल. त्यांना त्या संदर्भात सांगायचा विचार, "भाषाव्यवहारातील नियमन, प्रमाणीकरण, भाषाशिक्षण ही क्षेत्रे व्याकरणाच्या कक्षेबाहेरची असून ती आपली मानल्यामुळे पारंपरिक मराठी व्याकरणात प्रयोगशरणतेचे भान अनेकदा सुटलेले आहे." (पृ.२७) हा विचार पटवून देण्यापेक्षा मराठीच्या व्याकरणात त्याचा अभाव कसा आहे; हे सिद्ध करण्यावरच लेखकाचा भर आहे. या भिन्न भिन्न क्षेत्रांचा व्याकरणाशी नेमका संबंध कसकसा येतो व व्याकरणातील प्रयोगशरणतेशी त्याचा विचार दूरान्वयाने तरी जोडता येतो काय, याचा विचार झाला असता व मराठीच्या व्याकरणाला नवी दृष्टी मिळाली असती.

शिवाय नोंदणीमध्येही संशोधकाला आवश्यक असलेला नेमकेपणा नाही. उदा. 'ध्वनिशास्त्र, कोशशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र, वाक्य-पृथक्करण' ही भाषिक शास्त्रे व्याकरणबाह्य आहेत, असा स्पष्ट उल्लेख सबनिसांनी आपल्या व्याकरणाच्या प्रस्तावनेत केला आहे. "...निर्दिष्ट विषयांचा व्याकरणात समावेश होत नाही." (पृ.३५) या वाक्याच्या आगेमागे सबनिसांचा उल्लेख असायला पाहिजे होता. वाक्यपृथक्करणाच्या संदर्भातही 'नवलकर, आगरकर, गोडबोले व दामले यांचा उल्लेख आहे. "पण हा विषय व्याकरणात बसणारा नाही आणि तसा तो तडजोडीने बसवणे व्याकरणशास्त्राच्या विरोधी आहे, हे स्पष्ट शब्दांत बजावण्याचे काम अर्जुनवाडकरांनी केले." (पृ.१४५) या अर्जुनवाडकरांच्या कामाची सुरुवात सबनिसांनी १९५२ मध्येच ओबडधोबड पद्धतीने का होईना केली होती, याची जाणीव व्याकरण-अनभिज्ञ अभ्यासूंना व्हायला पाहिजे. या माहितीसाठी लेखकाला फार कष्ट घेण्याची गरज नव्हती. अर्जुनवाडकरांच्या 'मराठी व्याकरणाच्या इतिहासा'त ती पृ. २४८ वर आलेली आहे. लेखकाचे हे लेखन अर्जुनवाडकरांच्या व्याकरणविषयक या ग्रंथावर फार मोठ्या प्रमाणात विसंबून आहे. याचे प्रत्यंतर पुस्तक वरवर चाळले तरी येऊ शकते. एवढेच नव्हे तर, संदर्भसूचीमध्ये अनेक ग्रंथकारांची नावे असली तरी त्यांचे या पुस्तकात दिलेले जवळ जवळ सर्व संदर्भ

त्या त्या लेखकांच्या ग्रंथपृष्ठांसह 'मराठी व्याकरणाच्या इतिहासा'त सापडतात. उदाहरणादाखल काही पुरावे पुढे देत आहे.

पृ. १५ वरील चिपळूणकरांचा संदर्भ (पृ. १५) म.व्या.इ.पृ. ८७
पृ. १५ वरील गुंजीकरांचा संदर्भ (पृ. १६८) म.व्या.इ.पृ. १६६
पृ. २२ वरील चिपळूणकरांचा संदर्भ (पृ. ३-५) म.व्या.इ.पृ. ८६
पृ. २६ वरील गुंजीकरांचा संदर्भ (पृ. १९४) म.व्या.इ.पृ. १६६
पृ. २६ वरील चिपळूणकरांचा संदर्भ (पृ. १५) म.व्या.इ.पृ. ८७
पृ. २६ वरील मोडकांचा संदर्भ (पृ. २४७) म.व्या.इ.पृ. २३२
पृ. २६ वरील सबनिसांचा संदर्भ (पृ. ४८) म.व्या.इ.पृ. २४६

अर्जुनवाडकरांच्या 'मराठी व्याकरणाच्या इतिहासा'सारख्या ग्रंथाव्यतिरिक्त गुंजीकरादींचे लेखनाचे अन्य संदर्भ परबांनी या पुस्तकात किती दिले आहेत, हाच एक संशोधनाचा विषय होऊ शकेल.

ज्यांचे संदर्भ या व्याकरणाच्या इतिहासात नसतील त्यांच्यासाठी लेखकाने मूळ ग्रंथावलोकनाचे कष्ट कदाचित घेतले असतील. पण मूळ ग्रंथ न पाहता अनेक ग्रंथांच्या अभ्यासाचा देखावा आणणे, हा संशोधन-नीतीत बसणारा गुण नव्हे. लेखकाची ही अप्रामाणिक वृत्ती त्याच्या विषय-ज्ञानाबद्दलही वाचकाचे मत साशंक बनवते. उदा. १) धातूच्या संदर्भात 'क्रियापद ही संज्ञा पदस्वरूपी असल्याने ती शब्दजाती म्हणून स्वीकारता येत नाही, हे मत गुंजीकरांनी प्रथम सांगितले असताना लेखक त्याचे श्रेय मोडकांच्या नावावर टाकतो. (पृ.७०) २) पृ.७७ वरील क्रमांक ३ मध्ये 'चिपळूणकर, गुंजीकर असा कालदृष्ट्या व कार्यदृष्ट्या उल्लेख असणे उचित असताना लेखकाने गुंजीकरांचा उल्लेख प्रथम केला आहे. केवळ शब्दजातींच्याच संदर्भात नव्हे तर मराठीच्या व्याकरणाला संस्कृतच्या वळणावर नेण्याचे कार्य प्रथम चिपळूणकर करतात. ज्याचे श्रेय त्याच्या नावावर न दाखविण्याच्या अशा चुका, वर वर पाहता क्षुल्लक वाटतात, पण त्याच्यातून लेखकाची मूळ ग्रंथापर्यंत न पोहोचण्याची वृत्ती प्रकटत असते. लेखकाच्या मराठी व्याकरणविषयक अशा अपुऱ्या संशोधनवृत्तीमुळेच मराठीच्या व्याकरणाच्या आढाव्यात अनेक त्रुटी राहिलेल्या आहेत. त्यापेक्षा त्यांनी आपली नवीन तत्त्वदृष्टी मांडण्यावर लक्ष केंद्रित केले असते तर ते अधिक फायदेशीर ठरले असते.

आता वर्णासंबंधी. वर्णासंबंधीची त्यांची भूमिका "वर्णविचार हा व्याकरणाचा विषय नाही. तर त्याची व्याकरणातील व्याप्ती फक्त वर्णविकृती पुरती आहे."

(पृ.३९). त्यामुळे वर्णव्याख्या, वर्णनिकष, वर्णाचे स्वर-व्यंजनादी वर्गीकरण हे देऊन जागा अडवावी असे लेखकाला वाटत नाही. लेखक-संमत अर्जुनवाडकरांची पृ. ४५ वरची वर्णमालाही स्वर-व्यंजनांचे उल्लेख न करताच १ ते ४ संख्येत सांगितली आहे. त्यांच्या पृ.४२ वरच्या वर्णवर्गीकरणातील शुद्ध व शबल या संज्ञांचे स्पष्टीकरण नाही.

वर्णप्रकृती, वर्णविकृती, वर्णनिकष, वर्णचिकित्सा, स्वर-व्यंजन विभागणीला विरोध हे स्पष्टीकरण प्रथमतः येणे आवश्यक होते. पण विवेचनाच्या ओघात कुठे येईल तसे ते आले आहे.

लेखक-संमत अर्जुनवाडकरांच्या मते, "मूलध्वनी हा वर्णाचा निरपवाद निकष मानता येत नाही." (पृ.४६). ई - ऊ च्या संदर्भात ते स्थानसापेक्ष नसणे व अर्थभेदकत्व हे निकष लावून त्याला 'वर्णत्व' देतात. पंचवर्गीय द्वितीय-चतुर्थ व्यंजने मूलध्वनी नसूनही ते त्यांना आघात व क्रम यांच्या कसोट्यांवर (आघात न येणे व एकदम उच्चारण) वर्ण मानतात. पण तसेच उच्चारण असलेल्या न्ह (पंन्हे), ण्ह (कण्हेर) या हकारान्त उच्चारणाचे मात्र 'वर्णत्व' नाकारतात. त्यापेक्षाही ण्या (कण्या), ळ्या (कळ्या), ठ्या (काठ्या), ड्या (उड्या) या याकारान्त उच्चारणाची दखलही घेत नाहीत. त्यांचेही लेखन संयुक्त व्यंजनसदृश असले तरी त्यांच्या पूर्वाक्षरावर आघात येत नाही, या निकषावर त्यांचे 'वर्णत्व' सिद्ध होऊ शकते. पण "पूर्वाक्षरावर आघात ही संयुक्तत्वाची कसोटी निरपवाद नाही" (पृ.५१) अशी मूळ तत्त्वाशीच सोयीस्कर तडजोड स्वीकारतात. मराठीत अशा वर्णांना (किंवा - च वर्गीय दन्त्य मूलीय व्यंजनांनाही) लिपीमध्ये चिन्हे नाहीत, याचे कारण कदाचित मराठीच्या वर्णमालेत संस्कृतच्या वर्णमालेपेक्षा फारसा फरक संभवत नाही; ही दृष्टी असू शकेल.

लिपीमध्ये वर्णदर्शक चिन्ह असणे-नसणे यावर 'वर्णत्व' ठरत नसले, तरी वर्णाच्या स्थिरतेसाठी त्याचे साहाय्य होऊ शकते. कधीकधी चिन्ह तेच राहूनही उच्चारण बदलते, याचे प्रत्यक्ष उदाहरण म्हणून 'ऋ, ऌ' यांचे देता येईल. पूर्वीच्या काळी संस्कृतमध्ये कोणत्या ना कोणत्या कारणाने त्यांना 'वर्णत्व' असेल, पण आज मराठीत त्यांचे उच्चारण 'रि, रु' या अक्षराचे झालेले असताना (राज + ऋषी, महा + ऋषी यांसारख्या) संधीचा आधार घेऊन त्यांना 'वर्णत्व' देणे म्हणजे 'वर्णाचा उच्चारणाशी असलेला संबंध नाकारणे' होय.

वर्णाचा 'मूलध्वनी' हा निकष मुख्यत्वे 'ऐ, औ' या उच्चारणांना 'वर्णत्व'



अनुक्रमणिका

द्यायला बाधक ठरतो. त्यांचा समावेश वर्णमालेत करण्याचे कारण "पदसिद्धी आणि पदान्वय यांचे अंग म्हणून जी वर्णविकृती सांगायची तीसाठी ऐ व औ हे वर्ण मानणे लाघवाचे ठरते." (पृष्ठ ४६) पण मराठीत त्यांचे उच्चारण ऐ - ऐपत (आयूपत), वैताग (वइताग), सैतान (सयतान) व औ - दौत (दऊत), लौकर (लवकर), सौंगडी (सवंगडी) - अशा प्रकारचे केले जाते. संस्कृतमध्ये कोणत्या कारणासाठी त्याचा वर्णमालेत समावेश केला जातो, त्याचा संबंध मराठी उच्चारणाशी (आणला) नाही. (तर) ते 'वर्णत्वा'च्या कसोटीला उतरत नाहीत. हे लक्षात घ्यायला हवे.

नवीन पिढीसमोर एक स्वतंत्र भाषा म्हणून मराठीची वर्णमाला ठेवताना, तिच्यातील या नव्या प्रवृत्तींची व्यवस्था लावता आली पाहिजे.

आता शब्दासंबंधी. "शब्दाला 'प्रकृती' अशीही एक संज्ञा दिली जाते." (पृ.५९) पृ.८२ वरच्या वर्गीकरणातही प्रत्यय, प्रकृती, पद अशा संज्ञा योजलेल्या आहेत. शब्दविचाराऐवजी त्यांनी या प्रकरणाला 'प्रकृतिविचार' म्हणायला पाहिजे होते.

शब्द व प्रत्यय यांच्यातील फरक अर्थाशी निगडित असतो. ज्या वर्णसमूहांना अर्थ असतो ते शब्द व ज्यांना अर्थ नसतो ते प्रत्यय, अशी रूढ समजूत शब्दयोगी अव्ययांच्या विभाक्तिकार्याबद्दलच्या विवेचनातील "प्रत्ययांना अर्थ नसतो, हे म्हणणेही बरोबर नाही." (पृ.१०३) या विधानाने शंकास्पद ठरते.

प्रत्ययाची माहिती न देता एकदम "प्रकृतीला जे वाक्योपयोगी प्रत्यय लागतात तेव्हा तिला पद असे म्हणतात. 'पद' एका अर्थाने प्रत्यान्वित शब्दच असते." (पृ.५९) अशी 'पदा'ची व्याख्या देतात. या व्याख्येत मराठीतील 'पद' कल्पना येऊ शकते की नाही याचा विचार करण्याची त्यांना गरज वाटत नाही. मराठीतील शब्दांना 'पदत्व' येताना, वाक्योपयोगी प्रत्यय लागणे हा नियम निरपवाद नाही. १) विशेषणांना पदत्व येताना प्रत्यय लागत नाही, २) कर्ता-कर्मादी कारकार्थदर्शक येणारी नामे प्रत्ययरहित असतात, व ३) शब्दयोगी अव्ययांना विभक्तिप्रत्ययांपेक्षा वेगळे समजले, तर शब्दयोगी अव्ययान्त पदेही प्रत्ययरहितच असतात. या मुद्द्यांचा विचार करून मराठीतील पदाची व्याख्या द्यायला पाहिजे.

शब्दविचाराच्या संदर्भातही त्यांची तत्त्वदृष्टी अगोदरच्या व्याकरणकारांपेक्षा वेगळी आहे. त्यांच्या दृष्टिकोनातून मराठीच्या शब्दजातीच्या वर्गीकरणातील त्रुटी "शब्दांच्या वर्गीकरणाचे व्याकरणिक प्रयोजन व या प्रयोजनाशी सुसंगत असे वर्गीकरणाचे तत्त्व घेऊन मराठी शब्दाची काटेकोर व्यवस्था लावण्याचा प्रयत्न

पारंपरिक व्याकरणात अभावानेच आढळतो." (पृ.७७) ही आहे. ही त्रुटी दूर करणारे "प्रत्यय, प्रकृती, पद, जाती, उपाधी यांची गल्लत न करता व्याकरणिक कार्याशी सुसंगत अशा रूप व अन्वय तत्त्वांच्या अनुरोधाने" केलेले अर्जुनवाडकरांचे प्रत्यय, प्रकृती, पद यांचे वर्गीकरण लेखकाने पृ. ८२, ८३ वर दिले आहे. हाच तक्ता नजरेसमोर ठेवून लेखकाला शब्दविचाराचा आढावा त्रुटी दाखवीत घेता आला असता.

लेखकाला 'शब्दविचार' महत्त्वाचा वाटतो हे या प्रकरणांच्या पृष्ठसंख्येवरून लक्षात येऊ शकते. प्रकरणाच्या पहिल्या विभागातील सबनिसांपर्यंतच्या विचारांचा उद्देश शब्दविचारातील त्रुटी लक्षात आणून देणे हा आहे. पण तशी मांडणी करण्यापेक्षा, वेगवेगळ्या व्याकरणकारांच्या शब्दजातीच्या व्याख्या, शब्दजातींच्या उपवर्गांची जंत्री, शब्दयोगी अव्ययांची पानभर यादी अशा तपशिलातच - व मध्येच पान-अर्धा पान 'परामर्श' - हा भाग संपविला आहे.

वर्तमान मराठीच्या व्याकरणाचा विचार न करता 'परामर्श' (!) घेणे ही लेखकाची पद्धती शक्य-प्रयोजक या धातूंच्या विवेचनातही लक्षात येते. शक्य-प्रयोजक ही वाक्यरूपान्तर योजना आहे; कर्तरि-कर्मणि भावे प्रयोगाप्रमाणे. संस्कृतमधील वाक्यरूपान्तरांमध्ये मूळ धातूला तद्दर्शक प्रत्यय लागून (किंवा मूळ धातूमध्ये काही बदल होऊन) शक्य- प्रयोजक व कर्मणि-भावेची क्रियापदरूपे सिद्ध होत असतात. म्हणून संस्कृतच्या धातुविचारात त्याची आवश्यकता होती. पण मराठीत- निदान वर्तमान मराठीत - धातूला प्रत्यय लागून शक्य-प्रयोजकादी रूपे असलेली रचना कालबाह्य ठरत आहे. त्यापेक्षा 'संयुक्तक्रियापदे' योजून येणारी वाक्यरचना प्रचलित आहे. उदा.मूळ वाक्याची

१) (रामाने नलाकडून सेतू) बांधून घेतला - (प्रयोजक)
२) (नलाला सेतू ) बांधता येतो - (शक्य)
३) (नलाकडून सेतू) बांधला जातो. (कर्मणी)

या वाक्यांची दखल शक्य-प्रयोजक धातूंमध्ये घेता येत नाही. पण या मराठीच्या वेगळेपणाची दखलही न घेता दादोबा ते अर्जुनवाडकर यांच्या मतमतांतरांची चर्चा व 'अव' प्रत्यय 'शक्यचा' की 'अवि' प्रत्यय प्रयोजकाचा यावर वाद घालणे म्हणजे मूळ प्रश्नापर्यंत न पोहोचणे होय. 'संयुक्त क्रियापदां'ची व्यवस्था लावताना, या प्रकारची मराठीतील 'संयुक्त क्रियापदा'ची रचना करण्याची वाढती प्रवृत्तीही अशा उदाहरणांनी लक्षात येते. 'प्रत्ययमूलक रूपभेदाच्या' बरोबरीने

'क्रमवार पदभेदा'ची स्थिरावत असलेली प्रवृत्ती मराठीच्या व्याकरणाच्या व्यवस्थेत बसवावी लागते.

शब्दजातीच्या संदर्भात त्यांचा मुख्य विरोध 'अर्थ' हा निकष मानण्याला आहे. 'अर्थ' चा त्यांना अपेक्षित असलेला अर्थ पारिभाषिक संज्ञामधील 'अर्थ'मध्ये त्यांनी दिलेला आहे (पृ.१५६). आज्ञार्थ - विध्यर्थादी अर्थ, किंवा कारकार्थ - उपपदार्थादी अर्थ किंवा कोशगत शब्दाचा अर्थ हा 'अर्थ' येथे अभिप्रेत नसतो. कोशगत अर्थावरून नामादी शब्दजातींमध्ये असलेले 'वस्तुद्योतकत्व, धातूंमध्ये येणारे क्रियाद्योतकत्व, इत्यादींचा उल्लेख 'अर्थ' या निकषांमध्ये सांगितलेला असतो. या व्याकरणिक 'अर्था'चा संबंध प्रत्यय लागण्याशी असतो. उदा. 'ला' हा प्रत्यय वस्तुद्योतक शब्दजातीला-नामाला- लागतो तेव्हा तो कर्मार्थ व्यक्त करतो. पण तोच 'ला' प्रत्यय क्रियाद्योतक शब्दजातीला - धातूला- लागल्यावर तो भूतकाल दर्शवितो. वस्तुद्योतक गटाला विभक्तिप्रत्यय लागतात. क्रियाद्योतक गटाला आख्यात प्रत्यय लागतात; या भूमिकेचे खंडन करून केवळ रूपवादी भूमिका मांडण्याचा प्रयत्न पुस्तकात केलेला नाही.

विभक्तिविचारातही केवळ तपशिलावर भर असून मराठीच्या विभक्तिव्यवस्थेतील मूळ प्रश्नांकडे दुर्लक्ष आहे. १) मराठीत विभक्तिप्रत्ययांचा एकच एक गट सर्व प्रकारच्या नामा-सर्वनामांना लागतो. तशी स्थिती संस्कृतमध्ये नाही. संस्कृतमध्ये लिंगानुसार व अत्यांक्षरानुसार विभक्तिप्रत्ययांचा वेगवेगळा गट असतो. पण संस्कृतच्या या व्यवस्थेमुळे एका विभक्तीमध्ये एकच प्रत्यय असतो. पण मराठीमध्ये मात्र केवळ एकच एक प्रत्यय असलेली अशी कोणतीही विभक्ती नाही, ही प्रत्ययभिन्नता असूनही, त्यांचे एकच विभक्तिकार्य असल्याने त्यांचा समावेश एका विभक्तीमध्ये केला जातो. हे मराठीच्या कोणत्याही विभक्तीकडे पाहिले तरी लक्षात येते. मराठीत प्रत्ययवादी भूमिका घेतली तर 'स, ला, ते' या भिन्न प्रत्ययासाठी तीन भिन्न विभक्ती मानाव्या लागतील! २) मराठीत प्रथमेला प्रत्यय नाहीत. (केवळ अनेकवचनाचे स्वतंत्र प्रत्यय दाखवून प्रथमा विभक्ती मानता येणार नाही. मराठीत एक-अनेकवचनाचे प्रत्यय जवळजवळ समान असतात हे तत्त्व तिथे बाधित होते!) तिला शून्य प्रत्यय मानणे म्हणजे मराठीतील प्रत्ययरहिततेकडे असलेला वाढता कल दुर्लक्षित करणे होय. ३) कर्ता, कर्म ही कारकार्थे प्रत्ययावरून ओळखली न जाता वाक्यातील त्यांच्या क्रमावरून ओळख पटवीत आहेत. ४) जर शब्दयोगी अव्ययांना प्रत्यय असे म्हटले तर केवळ प्रत्ययनिष्ठतेचा आग्रह सोडून

देण्याशिवाय अन्य पर्याय नाही. याचा विचार करण्यापेक्षा कोणत्या व्याकरणात किती विभक्तिसंख्या दिलेली आहे याचा ऊहापोह म्हणजे तेच प्रश्न आणि तीच उत्तरे होत.

'संयुक्त क्रियापद' हा मराठीतील आणखी एक वादगस्त प्रश्न आहे. संयुक्त क्रियापद मानणारे किंवा न मानणारे अशा दोन्ही टोकाच्या भूमिकांचा विचार लक्षात घेतला तर संयुक्त क्रियापद न मानल्यामुळे कराव्या लागणाऱ्या तडजोडी अधिक आहेत. हे या पुस्तकातील संयुक्त क्रियापद न मानणाऱ्या लेखकाच्या मुद्द्यांचा विचार केला तर स्पष्ट होते. संयुक्त क्रियापद न मानले तर १) त्याला **वाचता** येते (कर्ता) व २) तो **वाचू** शकतो (कर्म) (पृ.१२६) कृदन्त-अव्ययांना कर्तृ-कर्म मानण्यासाठी कर्ता - कर्मादीच्या संदर्भातील नियमातही "वाक्यात कर्तृस्थानी किंवा कर्मस्थानी सव्यय गटातील शब्दच येतो असे नाही." (पृ.१३३) ते असा बदल सुचवितात.

पहिल्या वाक्याला ते भावे प्रयोगात समाविष्ट करतात, कारण 'वाचता' हे कर्तृस्थानी येणारे कृदन्त-अव्यय लिंग-वचनविरहित आहे (पृ.१३३). कर्तृपदच लिंगवचनविरहित असल्याचा प्रसंग भावे प्रयोगावर कधी ओढवला नसेल. भावे प्रयोगातील क्रियापद तृ.पु., नपु.लिं., ए.व. असते ते कर्ता प्रथमान्त नसल्यामुळे. कर्ता-कर्म ही नामादी शब्दजातीतली असतात. या नियमालाच गुंडाळून ठेवण्याची तयारी 'संयुक्त क्रियापद' न मानणाऱ्यांची आहे!

३) तो काम **करीत** आहे (विशेषण) (पृ.१२६) त्यामुळे 'तो काम आहे' हे पूर्ण वाक्य समजावे लागेल.

कदाचित या शंकांची उत्तरे ते ज्यांच्या आधारावर ही मते मांडत आहेत त्यांच्या ग्रंथात असतीलही पण त्यासाठी त्यांना दादोबांप्रमाणे 'माझ्या मोठ्यात पहा' असे म्हणावे लागेल.

फुगवलेल्या संदर्भसूचीबद्दल उल्लेख केला आहेच. पारिभाषिक शब्दांची सूचीही अपुरी आहे. आणि पारिभाषिक संज्ञा वाचत वाचत व्याकरण समजून घेणे म्हणजे कोशातील शब्दार्थ पाहत कादंबरीचा आस्वाद घेणे होय! अनुस्वार, वर्णप्रकृती, वर्णविकृती, क्रमतत्त्व, आघात, अन्वयात्मक कार्य, रूप इत्यादी या पुस्तकात वारंवार येणाऱ्या संज्ञांचा समावेश या सूचीत नाही.

त्रुटी अनेक आहेत, आवाका मर्यादित आहे. पण तरीही मराठीच्या व्याकरणाबद्दल हल्ली इतकेही कुणी लिहीत नाही, एवढ्यासाठी कौतुक! ■

**'स्नेहल', प्रोफेसर कॉलनी, अहमदनगर ४१४००१**

**१. ‘मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन’ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. १ जानेवारी, २००२ पासून वर्गणीचे दर पुढीलप्रमाणे आहेत.

वार्षिक वर्गणी - संस्थेला  रु. १२५ फक्त, पंचवार्षिक वर्गणी  रु. ५५० फक्त
व्यक्तीला  रु. १०० फक्त, पंचवार्षिक वर्गणी  रु. ४५० फक्त

**२. आजीव वर्गणी :**

मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १०००/-. पूर्वीच्या आजीव सदस्यांनी वर्गणीतील **वाढीव रक्कम रु. ४००/- भरावी, असे परिषदेतर्फे आवाहन आहे.**

**३. पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** धनादेश ‘मराठी अभ्यास परिषद’ या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता अंक याचा उल्लेख करावा.

**वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता :** कार्यवाह, नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. २४४८६०१५

**३. मागील अंक :**

‘भाषा आणि जीवन’ हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

**५. प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक ‘निवडक भाषा आणि जीवन’ (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाउसमध्ये मिळू शकेल. तसेच ‘भाषांतरमीमांसा’ हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

**६. जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान रु. ७५०/- , अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/-, शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन / चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

